


# औषधशास्त्र परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई

## भाषा संचालनालयाची इतर प्रकाशने

१ पदनाम कोश
२ वित्तीय शब्दावली
३ शासन व्यवहार कोश
४ ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश
५ गणितशास्त्र परिभाषा कोश
६ समाजशास्त्र परिभाषा कोश
७ तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र परिभाषा कोश
८ वाणिज्यशास्त्र परिभाषा कोश
९ रसायनशास्त्र परिभाषा कोश
१० भूशास्त्र परिभाषा कोश
११ शारीर परिभाषा कोश
१२ शिक्षणशास्त्र परिभाषा कोश
१३ यंत्र अभियांत्रिकी परिभाषा कोश
१४ स्थापत्य अभियांत्रिकी परिभाषा कोश
१५ भौतिकशास्त्र परिभाषा कोश
१६ विद्युत अभियांत्रिकी परिभाषा कोश
१७ कृषिशास्त्र परिभाषा कोश
१८ जीवशास्त्र परिभाषा कोश
१९ शरीरक्रियाशास्त्र परिभाषा कोश
२० राज्यशास्त्र परिभाषा कोश
२१ साहित्य समीक्षा परिभाषा कोश
२२ लोकप्रशासन परिभाषा कोश
२३ अर्थशास्त्र परिभाषा कोश
२४ धातूशास्त्र परिभाषा कोश
२५ मानसशास्त्र परिभाषा कोश
२६ व्यवसाय व्यवस्थापन परिभाषा कोश
२७ संख्याशास्त्र परिभाषा कोश
२८ मराठी लघुलेखन
२९ मराठी लघुलेखन मार्गदर्शिका
३० मराठी टंकलेखन प्रवेशिका
३१ शासन व्यवहारात मराठी
३२ प्रशासन वाक्प्रयोग
३३ प्रशासनिक लेखन
३४ राजभाषा परिचय
३५ राजभाषा परिचय कार्यरूप व्याकरण
३६ कार्यदर्शिका
३७ शुद्धलेखन नियमावली
३८ मंथन
३९ भारताचे संविधान

## औषधशास्त्र उपसमिती

### अध्यक्ष

डॉ. दि. शं. श्रोत्री, पुणे विद्यापीठ.

### प्रतिनिधि-सदस्य

डॉ. अ. म. करंदीकर, मुंबई विद्यापीठ.

डॉ. अ. दे. देशपांडे, शिवाजी विद्यापीठ.

प्रा. रवींद्र रुक्मिणीबाई पंढरीनाथ,
श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठ.

डॉ. ना. ल. सदरे, मराठवाडा विद्यापीठ.

डॉ. प. ज. मोघे, मराठवाडा विद्यापीठ.

डॉ. अ. वि. कस्तुरे, नागपूर विद्यापीठ.

डॉ. सि. वा. जोशी, नागपूर विद्यापीठ.

डॉ. अ. ना. सावजी, नागपूर विद्यापीठ.

डॉ. स. दि. कामत, मराठी विज्ञान परिषद.

### सदस्य-सचिव

श्री. प. ग. पाटील, भाषा संचालक.

# प्रस्तावना

मातृभाषा शिक्षणाचे माध्यम असावे हे आता सर्वमान्य झाले आहे. महाराष्ट्र राज्यात मराठीला राजभाषेचे स्थान मिळाल्यानंतर पदवी परीक्षेपर्यंतच्या शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हा विचार दृढ झाला. माध्यमाचे हे परिवर्तन घडवून आणण्यात अर्थातच अडचणी होत्या. मुख्य म्हणजे शास्त्रीय व तांत्रिक विषयांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. निरनिराळे विषय शिकवण्यासाठी आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भपुस्तके मराठीतून लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी या दृष्टीने प्रयत्न केले होते. परंतु ते मर्यादित स्वरूपाचे व त्यांच्यापुरते होते. सर्व विद्यापीठांतून समान व एकरूप परिभाषा वापरली जावी यासाठी नव्याने प्रयत्न करणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी १९६७ साली महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची संयुक्त बैठक घेण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने सर्व विज्ञानविषयक व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी आणि संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ व महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ यांच्याकडे सोपवावे . असे ठरले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांमधील काही मूलभूत विषयांच्या उपसमित्या प्रथम स्थापन करून व काही निदेशक तत्त्वे ठरवून परिभाषा निर्मितीच्या कामास सुरुवात केली. या उपसमित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी आणि मराठी विज्ञान परिषदेचा प्रतिनिधी यांना सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषा तयार करताना, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती जवळची वाटेल याचे भान ठेवणे आवश्यक होते. त्यामुळे ही परिभाषा मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा न येता केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी शक्यतो मिळती-जुळती ठेवण्याचा प्रयत्न करण्यात आला.

औषधशास्त्र परिभाषा निर्मितीचे काम एक उपसमिती नेमून पूर्ण करण्यात आले आहे. २ जानेवारी १९८४ रोजी या उपसमितीची स्थापना करण्यात आली व तिची पहिली बैठक ६ जानेवारी १९८४ रोजी झाली. उपसमितीच्या एकूण ६९ बैठकी घेण्यात आल्या व त्यांत सुमारे ५,३०० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित करण्यात आले. शेवटची बैठक दिनांक २६ ऑगस्ट १९८७ रोजी झाली.

औषधशास्त्राची परिभाषा निश्चित करण्याच्या दृष्टीने प्रस्तुत उपसमितीने बरेच परिश्रम घेतले. ज्या पारिभाषिक शब्दांचा अर्थ स्पष्टीकरणाशिवाय सुलभतेने

समजणार नाही असे सुमारे ३५० शब्द निवडून उपसमितीने त्या निवडक संज्ञांची स्पष्टीकरणेही दिली आहेत व त्यांचा समावेश कोशाच्या शेवटी परिशिष्टामध्ये करण्यात आला आहे. या कोशाची मुद्रिते तपासताना काही त्रुटी आढळल्या त्यांचे निराकरण करण्यासाठी या उपसमितीचे अध्यक्ष डॉ. दि. शं. श्रोत्री यांनी आस्थेने सहकार्य केले. त्यांनी तसेच अन्य सदस्यांनी पर्यायनिश्चितीच्या कामात खूप रस घेऊन हे काम शक्य तितक्या लवकर पूर्ण केले याबाबत या सर्वांचा मी अतिशय आभारी आहे.

या उपसमितीच्या सदस्यांची नावे कोशाच्या सुरुवातीस देण्यात आली आहेत भाषा सल्लागार मंडळाचे पुनरुज्जीवन करण्याबाबत या कार्यालयाने शासनाकडे प्रस्ताव पाठवलेला आहे. त्यास अद्याप मंजुरी मिळाली नसल्याने भाषा सल्लागार मंडळाच्या सदस्यांची नावे दिलेली नाहीत.

उपसमितीच्या बैठकींना अभ्यागत म्हणून निरनिराळ्या विद्यापीठांचे संस्कृततज्ञ व औषधशास्त्र विषयाचे तज्ञ प्राध्यापक उपस्थित राहिले. त्यांचे या परिभाषा निश्चितीच्या कामात बहुमोल साह्य झाले. या सर्वांचे तसेच महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलसचिव यांनी वेळोवेळी केलेल्या सहकार्याबद्दल त्यांचे शासनाच्या वतीने मी मनःपूर्वक आभार मानतो.

या उपसमितीचे कामकाज सुरू असताना मराठवाडा विद्यापीठाचे प्रतिनिधी डॉ. ना. ल. सदरे यांचे दुःखद निधन झाले. कोश निर्मितीच्या कामी त्यांची बहुमोल मदत झाली होती. हा कोश प्रकाशित स्वरूपात पाहण्यास ते आज आपल्यात नाहीत याचे तीव्र दुःख होते.

या कोशाच्या मुद्रणाच्या कामात संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री, मुंबई, यांचे बहुमोल सहकार्य मिळाले. या सहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

अनेक तज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना तसेच या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना व सर्व संबंधित शास्त्र विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणितशास्त्र, रसायनशास्त्र, समाजशास्त्र, वाणिज्य-शास्त्र, तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र, ग्रंथालयशास्त्र, शारीर, भूशास्त्र, भौतिकशास्त्र, शिक्षणशास्त्र, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, कृषिशास्त्र, शरीरक्रियाशास्त्र, जीवशास्त्र, राज्यशास्त्र, वाणिज्यशास्त्र (सुधारित), साहित्य-समीक्षा, अर्थशास्त्र, लोकप्रशासन, धातुशास्त्र, मानसशास्त्र, ग्रंथालयशास्त्र (सुधारित), व्यवसाय व्यवस्थापन, रसायनशास्त्र (सुधारित) व संख्याशास्त्र या विषयांचे परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच भूगोलशास्त्र, भाषाविज्ञान व वाङ्मयविद्या,

गणितशास्त्र (सुधारित), विकृतिशास्त्र, वृत्तपत्रविद्या, न्यायवैद्यक व विषशास्त्र या विषयांच्या परिभाषेचे काम पूर्ण होण्याच्या मार्गावर असून ते कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येतील. प्रस्तुत औषधशास्त्र परिभाषा कोश हा प्रकल्पातील एक टप्पा आहे.

या कोशातील परिभाषेचा जाणकारांनी आपुलकीने व अभ्यासू वृत्तीने विचार करावा व या परिभाषेचा वापर करताना त्यांच्या नजरेस येणाऱ्या उणिवा भाषा संचालनालयाच्या कृपया निदर्शनास आणून द्याव्यात, तसेच ती सुधारण्याच्या दृष्टीने काही सूचना करावयाच्या असल्यास त्या भाषा संचालनालयाकडे अवश्य पाठवाव्यात, अशी विनंती आहे.

**प. ग. पाटील,**
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

मुंबई,
दिनांक १ मे १९९७.

# औषधशास्त्राची परिभाषा

वैद्यकीय महाविद्यालये, औषधनिर्माणशास्त्राचे पदवी आणि पदविका अभ्यासक्रम, औषधनिर्मिति उद्योग आणि औषधप्रशासन या क्षेत्रांतील व्यक्तींना उपयोगी ठरेल अशी परिभाषा या कोशात संकलित केली आहे. वैद्यकीय आणि औषधनिर्माण अभ्यासक्रमांच्या पदवी पातळीपर्यंत विविध पाठ्यपुस्तके व संदर्भग्रंथांत आढळणाऱ्या इंग्रजी संज्ञांची निवड केल्यामुळे ही अपेक्षा पूर्ण होईल असे वाटते. एम.बी.बी.एस. अभ्यासक्रमातील सैद्धांतिक व उपयोजित औषधशास्त्र, प्रायोगिक औषधशास्त्र, चिकित्सालयीन उपयोजनांच्या उगवत्या उपशाखा यांमधील ग्रंथांचा उपयोग या निवडीसाठी केला आहे. त्याचप्रमाणे बी. फार्म.च्या अध्ययनात येणारी पुढील प्रमुख क्षेत्रे अंतर्भूत केली आहेत--वितरणी आणि भौतिकी औषधनिर्माण, औषध-अभिज्ञान, औषध-निर्माण रसायन, औषधनिर्माण विश्लेषण, औषधनिर्माणविद्या, रुग्णालयीन औषधनिर्माण-शास्त्र, औद्योगिक औषधनिर्माणशास्त्र, न्यायालयीन औषधनिर्माणशास्त्र, जैव औषधनिर्माणविद्या आणि औषध बलगतिकी.

या सर्व शाखांमधील सुमारे पंचवीस पुस्तकांमधून संज्ञांचा शोध घेताना प्रकरणवार परामर्शाबरोबरच प्रत्येक पुस्तकाच्या शेवटी असलेली मूळाक्षरी सूचीही मदतीसाठी वापरली आहे. त्यामुळे महत्त्वाचे शब्द चुकून वगळले जाण्याची शक्यता कमी झाली. शारीर, शरीरक्रियाशास्त्र, जीवशास्त्र, विकृतिशास्त्र, इत्यादी आधीच सिद्ध झालेल्या कोशांमधील शब्द आवश्यक तेव्हा त्यांच्या पर्यायांसह जसेच्या तसे स्वीकारले आहेत. परन्तु काही ठिकाणी उपसमितीला समर्पक वाटणारे अन्य पर्यायही समाविष्ट केले आहेत. आयुर्वेदीय ग्रंथांमधील शब्दांची निवड मराठी भाषेतील पर्याय म्हणून करताना पाश्चात्य संकल्पना व आयुर्वेदीय संकल्पना यांच्यात साम्य असल्याची खात्री करून घेतली आहे.

वनस्पती व प्राणी यांच्या जातिप्रजातींची नावे (द्विपद नाम पद्धतीची) लिप्यंतरणाने स्वीकारण्याचे धोरण आहे व तेच धोरण औषधे आणि रसायनांच्या नावांनाही लागू पडते. त्यामुळे कोशात समावेश न झालेल्या अशा सर्व संज्ञांच्या बाबतीत लिप्यंतरण हा पर्याय स्वीकारला आहे असे गृहीत धरावे. औषधांच्या अधिकृत इंग्रजी नावांसाठी आणि अशा नामकरणामागील मार्गदर्शक तत्त्वांसाठी जागतिक आरोग्य संघटनेकडून वारंवार प्रसिद्ध होणाऱ्या आंतरराष्ट्रीय निरायत्त नावांच्या (*International Nonproprietary Names*) याद्या जिज्ञासूंनी पहाव्यात. भारतातील औषधांच्या व्यापारी नावांसाठी *CIMS*, *MIMS* यांसारख्या सूचीग्रंथांची किंवा भारतीय औषधनिर्माता संघटनेच्या *Indian Pharmaceutical Guide* या वार्षिक प्रकाशनाची मदत होऊ शकेल.

कोशातील काही संज्ञांच्या स्पष्टीकरणासाठी थोडक्यात, सुटसुटीत अशा स्पष्टीकरणात्मक व्याख्या द्याव्यात असे उपसमितीने ठरवले. त्यानुसार अशा सुमारे साडेतीनशे व्याख्या आढळतील. काहीशा अपरिचित अशा मराठी पर्यायांबरोबर व्याख्यांचा

सह:

वापर केल्याने कोशाची उपयुक्तता वाढेल असा विश्वास आहे. तसेच वैद्यक व औषध-निर्माण या दोन्ही शाखांमधील अभ्यासकांना एकमेकांच्या क्षेत्रातील संज्ञा समजावून घेण्यास मदत होईल.

उपसमितीच्या सभासदांमध्ये महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी होते एवढेच नव्हे तर, ते औषधक्षेत्रातील विविध उपशाखांमध्ये कार्य करत होते. त्यामुळे संज्ञांच्या निवडीत पूर्णता येऊन कोश तयार करण्याचे कामही सुकर झाले. या सर्व सहकाऱ्यांच्या मदतीबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. भाषा संचालनालयाचे सदस्य-सचिव व त्यांचे कार्यालयातील सहायक यांचेही मोलाचे मार्गदर्शन उपसमितीला मिळाले आहे. जानेवारी, १९८४ ते ऑगस्ट, १९८७ या काळात उपसमितीच्या सुमारे ६९ बैठकी झाल्या व त्यांमध्ये औषधशास्त्राचा हा कोश संकलित झाला.

डॉ. दि. शं. श्रोत्री,
अध्यक्ष,
औषधशास्त्र उपसमिती.

# कोशपरिचय

**कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे :--**

**इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम.**---इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून Chambers's Technical Dictionary व Webster's Third New International Dictionary यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा वर्णलेखन ( spelling ), इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

**इंग्रजी शब्दजाती.**---प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शवली आहे (जसे.--- *n.; adj.; v. t.; v. i.*, इ.). इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविलेली नाही.

**विषयनिर्देशक संक्षेप.**---एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शवणारा संक्षेप इंग्रजी इटॅलिक मुद्राक्षरांत दिला आहे.

**पर्याय, अर्थच्छटा व स्पष्टीकरणे.**---इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिले आहेत. पर्याय देताना वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायापूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरण दिले आहे किंवा काही ठिकाणी पर्यायानंतर कंसात मराठी स्पष्टीकरणही दिले आहे. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसात, ' as in : ' असेदेऊन त्या पर्यायांचा उपयोग करून दाखविला आहे.

या कोशातील काही इंग्रजी संज्ञा तारांकित केलेल्या आहेत. अशा तारांकित संज्ञांचे इंग्रजी × मराठी स्पष्टीकरण कोशाच्या शेवटी परिशिष्टामध्ये दिलेले आहे.

**मराठी शब्दजाती.**---इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शवली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शवली नाही.

**लिंगनिर्देश.**---(१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे, तो नाम असल्यास, लिंगनिर्देश केला आहे. (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायापुढे लिंगनिर्देश केला आहे.

**शब्दकुले.**---शब्दकुळातील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यातील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवतात. असे शब्द त्यातल्या महत्त्वाच्या शब्दाखाली पर्यायानंतर *cf.* असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले

आहेत व तिथे *cf.* असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञखाली हे कुळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृष्ठ ९३ वरील tablet हे कुळ पहावे. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**जोडसंज्ञा.**—काही महत्त्वाच्या पारिभाषिक संज्ञांखाली त्या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शवणाऱ्या जोडसंज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृष्ठ ६४ वरील mixer ही संज्ञा पहावी. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**समानार्थी शब्द.**—काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शवण्यासाठी एकाच ठिकाणी दिले आहेत. ज्या शब्दासमोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात ( *also* ) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शवला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर (=) अशी खूण दर्शवून पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शवला आहे. त्याचप्रमाणे इंग्रजी शब्दाच्या वर्णलेखनात ( spelling ) थोडाफार फरक असलेले इंग्रजी शब्दही वरील पद्धतीनेच दर्शवण्यात आले आहेत.

## भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली निदेशक तत्त्वे

१. **शब्दसंग्रह व पर्याय.**—हिंदी वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेची निर्मिती करताना, केंद्र सरकारने विज्ञान व तंत्र क्षेत्रात यापूर्वी झालेल्या कार्याचा आढावा घेतला होता आणि निरनिराळ्या राज्यांत याबाबत झालेल्या एकूण कार्यात समन्वय साधण्याचे प्रयत्नही केले होते. मराठी परिभाषेची निर्मिती करतानादेखील त्याच धोरणाचा अवलंब करून प्रत्येक विद्याशाखेतील शब्दांचे संकलन करणे अगत्याचे आहे. त्यासाठी प्रत्येक विद्याशाखेची केंद्र सरकारने तयार केलेली विज्ञान शब्दावली आधारभूत मानून, पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ आणि इतर विज्ञान संस्था यांच्या शब्दावल्यांचाही विचार करावा. तसेच माध्यमिक स्तरावरील वैज्ञानिक व तांत्रिक विषयांच्या पाठ्यपुस्तकांतून पुष्कळशा तांत्रिक शब्दांचे जे पर्याय रूढ झाले आहेत, ते देखील विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञा.**—'आंतरराष्ट्रीय संज्ञा' या शक्यतोवर त्यांच्या प्रचलित इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे.

आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणत: पुढील गोष्टींचा समावेश होतो :—

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे वगैरेंसह) यांची नावे, ही नावे लिप्यंतरित करून देताना नावांपुढे त्यांची संकेतचिन्हेसुद्धा द्यावीत. जसे.—हायड्रोजन (H), कार्बन (C).

मात्र, मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जसेच्या तसे ठेवावेत. जसे.— तांबे Cu, किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानिक $_{90}Th^{238}$ निकोटीन $C_{10}H_{14}N_2$.

रासायनिक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून पुढीलप्रमाणे द्यावीत :—




गंधक, रुपे, तांबे, कथील, पारा, जस्त, शिसे, इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच राहावेत; परंतु रासायनिक संयुगांची नावे देताना ती त्यांच्या प्रचलित इंग्रजी अथवा ग्रीक नावांप्रमाणेच द्यावीत.

(ब) वजने, मापे आणि परिमाणे. जसे.—कॅलरी, ॲम्पिअर वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात, जसे,—फॅरनहाइट श्रेणी (फॅरनहाइट), व्होल्टामीटर (व्होल्टा), ॲम्पिअर (ॲम्पिअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूशास्त्र, इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा (binomial nomenclature).

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन, यांसारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे वगैरे. जसे.—साइन (sin), कोसाइन (cos), टॅन्जंट (tan), लाग (log) वगैरे.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा, महाविद्यालये, इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत. जसे.—ऑक्सिजन—प्राणवायू, कॅलरी—ऊष्मांक, sin—ज्या, cos—कोज्या वगैरे. तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्यायदेखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. जसे.—cm म्हणजे 'सेंटिमीटर' या संज्ञेचा संक्षेप 'सें. मी.' असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यांवर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावेत.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारणतः वापरण्यात येणारे पर्याय तसेच राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत ते तसेच ठेवावेत. जसे.—मशीन, इंजिन, मीटर, लिटर वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपांत द्यावेत.

८. **मिश्र शब्दांची निर्मिती.**—वैज्ञानिक परिभाषा तयार करताना 'pasteurisation—पाश्चरीकरण', 'voltage—व्होल्टता' अशांसारखे मिश्र शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समानार्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

# संक्षेप सूची

| | | |
|---|---|---|
| *abbr.* | .. | abbreviation |
| *adj.* | .. | adjective |
| *adv.* | .. | adverb |
| *cf.* | .. | compare |
| *Chem.* | .. | Chemistry |
| in comb. | .. | in combination or used in combination |
| *Microbiol.* | .. | Microbiology |
| *n.* | .. | noun |
| *Pathol.* | .. | Pathology |
| *pfx.* | .. | prefix |
| *Pharm. Engin.* | | Pharmaceutical Engineering |
| *pl.* | .. | plural |
| *sing.* | .. | singular |
| *Stat.* | .. | Statistics |
| *usu.* | .. | usually |
| *v. i.* | .. | verb, intransitive |
| *v. t.* | .. | verb, transitive |
| *v. t. & i* | .. | verb, transitive and intransitive |
| *wrt* | .. | with reference to |

| | | |
|---|---|---|
| अ. व. | .. | अनेक वचन |
| न. | .. | नपुंसकलिंग |
| पु. | .. | पुल्लिंग |
| सा. | .. | सामान्य लिंग |
| स्त्री. | .. | स्त्रीलिंग |

# A

**ab–**, *pfx.* अप-
**abdomen**, *n.* उदर (न.)
**abdominal distension**, उदरस्फीति (स्त्री.), उदर फुगार
**aberration**, *n.* विपथन (न.)
**ablate**, *v.t.* उच्छेदन करणे
**ablation**, *n.* उच्छेदन (न.)
**ABO antigen**, एबीओ प्रतिजन (एबीओ रक्तगट प्रतिजन)
**abortion**, *n.* गर्भपात (पु.)
*cf.* miscarriage, गर्भस्राव
**abrasion**, *n.* अपघर्षण (न.)
**abrasion test**, अपघर्षण चाचणी
**abscess**, *n.* विद्रधि (पु.), गळू (न.)
**abscissa**, *n.* भुज (पु.)
**absence**, *n.* अभाव (पु.)
**absolute**, *adj.* १ निरपेक्ष २ केवल
**absolute activity**, निरपेक्ष सक्रियता (*wrt* radioactivity–usu. expressed as disintegration per minute–DPM)
**absolute filter**, निरपेक्ष निस्यंदक
**absolute humidity**, १ निरपेक्ष आर्द्रता २ केवल आर्द्रता
**absolute magnitude**, निरपेक्ष परिमाण
**absolute temperature**, निरपेक्ष तापमान
**absolute temperature scale**, निरपेक्ष तापमापन श्रेणी (निरपेक्ष तापमान मापनश्रेणी)
**absolute value**, निरपेक्ष मूल्य
**absorb**, *v.t. & i.* शोषणे, शोषण करणे, शोषण होणे
**absorbable**, *adj.* शोषणक्षम, शोष्य
**absorbable haemostat**, शोषणक्षम रक्तस्राव-रोधी, शोष्य रक्तस्रावरोधी
**absorbable suture**, शोष्य सूत्र (शोष्य शिवणसूत्र)
**absorbance**, *n.* शोषकता (स्त्री.), अवशोषकता (स्त्री.)
**absorbed**, *adj.* शोषित
**absorbent**, *adj.* शोषक, अवशोषक, अवशोषी
**absorbent bases**, अवशोषी आधारद्रव्ये (न.अ.व.)
**absorbent cotton**, अवशोषी कापूस
**absorption**, *n.* शोषण (न.), अवशोषण (न.)
**absorption band**, अवशोषण पट्ट
**absorption base**, शोषण आधारक
**absorption by villus**, उद्वर्धीय शोषण
**absorption, fate and excretion**, शोषण, भवितव्य आणि उत्सर्जन
**absorption frequency**, शोषण वारंवारता
**absorption of radiation**, प्रारण शोषण
**absorption rate constant**, अवशोषण वेग स्थिरांक
**absorption spectra**, (usu. pl.) शोषण पंक्ती (स्त्री. अ. व.)

**absorption spectroscopy,** शोषण पंक्तिदर्शन
**absorptivity,** *n.* शोषकता (स्त्री.)
**abstainer,** *n.* वर्जक (पु.)
**abstinence,** *n.* वर्जन (पु.)
**Acacia,** *n.* ॲकेशिआ (पु.)
**Acacia gum,** बाभळीचा डिंक
**Acacia syrup,** ॲकेशिआ सिरप, ॲकेशिआ अवलेह
**accelerant,** *n.* (one that accelerates) त्वरक (पु.)
**acceleration,** *n.* त्वरण (न.)
**accelerator,** *n.* त्वरक (पु.)
**acceptable risk,** स्वीकार्य जोखीम
**acceptance,** *n.* स्वीकार (पु.)
**acceptance mechanism,** स्वीकारी यंत्रणा
**acceptance sampling,** स्वीकृतिपूर्व नमुना-चाचणी
**accessory,** *n.* उपसाधन (न.)
**acclimatisation,** *n.* (*also* acclimatation) परिस्थिति-अनुकूलन (न.)
**accreditation of pharmacy residencies,** निवासी औषधनिर्मात्यांची अधिकृती
**accumulation curve,** संचय वक्र
**accumulation plateau,** संचयन उच्चसमता
**accuracy,** *n.* अचूकपणा (पु.), अचूकता (स्त्री.)
**acebutolol,** *n.* ॲसिब्युटोलॉल (न.)
**acetaminophen poisoning,** ॲसिटॅमिनोफेनची विषबाधा
**acetanilide,** *n.* (*also* acetanilid) ॲसिटॅनिलिड (न.)
**acetazolamide,** *n.* ॲसेटॅझोलॅमाइड (न.)
**acetic acid,** ॲसेटिक आम्ल
**acetone,** *n.* ॲसिटोन (न.)
**acetylcholine,** *n.* ॲसिटिलकोलीन (न.)
**acetylcholinesterase,** *n.* ॲसिटिलकोलिनेस्टरेज (न.)
**acetylcholinesterase inhibitor,** ॲसेटिलकोलिनेस्टरेज संदमी, ॲसेटिलकोलिनेस्टरेज अवरोधी
**achlorhydria,** *n.* जठर आम्लहीनता (स्त्री.)
**achylia,** *n.* (*also* achylosis) वसालसीकाहीनता (स्त्री.)
**acid,** *n.* आम्ल (न.)
**acid-base balance,** आम्ल-आम्लारि समतोल, आम्ल-अल्क समतोल
**acid-base disturbance,** आम्ल-आम्लारि व्यस्तता, आम्ल-आम्लारि असंतुलन
**acid-base incompatibility,** आम्ल-आम्लारि असंयोज्यता
**acid-fast,** *adj.* आम्लसाही, आम्लस्थायी
**acid-fast staining,** आम्लस्थायी अभिरंजन
**acid-forming salt,** आम्लकारी क्षार
**acidimetry,** *n.* आम्लमिति (स्त्री.)
**acidity,** *n.* आम्लता (स्त्री.)
**acidity constant,** आम्लता स्थिरांक
**acidosis,** *n.* रक्ताम्लता (स्त्री.), आम्लवृद्धि (स्त्री.)
**acid-rebound,** *n.* आम्ल पुनरुत्प्लावन (न.)
**acidulin,** *n.* ॲसिड्युलिन (न.)
**acid value,** आम्ल मूल्य
**acinobacter infection,** ॲसिनोबॅक्टर संसर्ग
**acinus,** *n.* कोष्ठक (न.)
**acne,** *n.* मुरूम (पु.)
**acquired immunity,** उपार्जित प्रतिक्षमता
***acquired tolerance,** उपार्जित सह्यता
**acquired toxicity,** अल्पकालिक विषाक्तता
**acridine,** *n.* ॲक्रिडीन (न.)
**acrocyanosis,** *n.* शाखा-नीलता (स्त्री.) (हातपाय निळे पडणे)
**acrodynia,** *n.* ॲक्रोडिनिआ (पु.), शाखावेदना (स्त्री.)
**acromegaly,** *n.* अतिशीर्षशाखता (स्त्री.)
**acrylic plastic,** ॲक्रिलिक प्लास्टिक
**Act and Rules,** अधिनियम व नियम

**actinomycosis**, *n.* किरणकवककरोग (पु.), ॲक्टिनोमायकोसिस रोग (पु.)
**action potential**, कार्यकारी विभव
**activated**, *adj.* सक्रियित
**activated charcoal**, सक्रियित कोळसा
**activation analysis**, सक्रियण विश्लेषण
**activator**, *n.* सक्रियक (पु.)
**active**, *adj.* सक्रिय, क्रियाशील
**active acquired immunity**, सक्रिय उपार्जित प्रतिक्षमता
**active immunity**, स्वनिर्मित प्रतिक्षमता
**active ingredient**, सक्रिय घटक
*__active principles__, १ क्रियाशील तत्त्वे (न.अ.व.) २ सत्त्वे (न.अ.व.)
*__active transport__, सक्रिय परिवहन
**activity**, *n.* १ क्रिया (स्त्री.) २ सक्रियता (स्त्री.)
**activity coefficient**, क्रिया गुणांक
**actometer**, *n.* क्रिया आमापी (पु.) (as in : photoactometer प्रकाश-क्रियाआमापी)
**acute**, *adj.* १ तीव्र २ अल्पकालिक
**acute gangrene**, तीव्र कोथ
**acute lymphocytic leukaemia**, तीव्र लसीकापेशीय श्वेतपेशी कर्करोग
**acute radiation syndrome**, तीव्र प्रारण संलक्षण
**acute toxicity**, अल्पकालिक विषाक्तता
**adaptation**, *n.* अनुकूलन (न.)
**addicting**, *adj.* आसक्तिजनक, व्यसनजनक
*__addiction__, *n.* आसक्ति (स्त्री.), व्यसन (न.)
**addiction liability**, १ औषधासक्ति प्रवणता २ व्यसन प्रवणता
**addiction to drugs**, औषधासक्ति (स्त्री.)
**Addisonian anaemia**, (*also* called pernicious anaemia) ॲडिसन पांडुरोग
**Addison's disease**, ॲडिसन रोग
**addition reaction**, समावेशी अभिक्रिया
**additive**, *adj.* समावेशी
*__additive effect__, समावेशी परिणाम
*__additive properties__, समावेशी गुणधर्म (पु.अ.व.)
**additives**, *n.pl.* समावेशी (पु.अ.व.)
**additivity**, *n.* समावेशिता (स्त्री.)
**additivity principle**, समावेशिता तत्त्व
**adenohypophyseal hormone**, ग्रंथिपीयूषिका संप्रेरक
**adenohypophysis**, *n.* ग्रंथिपीयूषिका (स्त्री.)
**adenoma**, *n.* ग्रंथिअर्बुद (पु.)
**adhesion**, *n.* आसंजन (न.)
**adhesive**, *adj.* आसंजी, आसंजक
**adhesive bandage**, आसंजनशील पट्टी, चिकटपट्टी (स्त्री.)
**adhesive bandage plaster**, (औषधीयुक्त किंवा अन्यथा) चिकट पटलेप
**adhesive tape**, आसंजी फीत, चिकटपट्टी (स्त्री.)
**adiabatic cooling**, समोष्ण शीतन
*__adiabatic expansion__, *Thermodynamics* समोष्ण प्रसरण
**adiabatic process**, समोष्ण प्रक्रिया
**adiabatic saturation**, समोष्ण संपृक्ति, समोष्ण संतृप्ति
**adjunct**, *n.* उपांग (न.)
**adjuvant**, *adj.* साह्यकारी
*n.* सहयोगी (पु.)
*ad libitum*, यथेच्छ, इच्छेनुसार
**administration rate**, (औषध) देण्याचा वेग
**administration route**, (औषध) देण्याचा मार्ग
**admission card**, प्रवेशपत्रिका (स्त्री.)
**admission sheet**, प्रवेशपत्र (न.)
**admixture**, *n.* अधिमिश्रण (न.)
**adrenal cortex**, अधिवृक्क बाह्यांग
**adrenal corticosteroid**, अधिवृक्क बाह्यांग-स्टेरॉइड
**adrenalectomy**, *n.* वृक्क उच्छेदन (न.)
**adrenal hyperplasia**, अधिवृक्क अतिपेशिता

**adrenaline**, *n.* ॲड्रेनलिन (न.)

**adrenal insufficiency**, ॲड्रेनलिन न्यूनता

**adrenergic**, *adj.* ॲड्रेनलिनधर्मी, ॲड्रेनलिन-(ॲड्रेनलिनशी संबंधित. उदा. चेतातंतु किंवा ग्राही)

**adrenergic blocking drug**, ॲड्रेनलिनधर्मी-रोधी औषध

**adrenergic neuron**, ॲड्रेनलिन चेतापेशी

**adrenergic transmission**, ॲड्रेनलिन पारेषण

**adrenocortical carcinoma**, अधिवृक्क-बाह्यांग कर्कार्बुद

**adsorb**, *v.t.* अधिशोषण करणे

**adsorbent**, *adj.* अधिशोषक

**adsorption**, *n.* अधिशोषण (न.)

**adsorption chromatography**, अधिशोषण वर्णलेखन

**adsorption energetics**, अधिशोष ऊर्जा प्रकटनशास्त्र

**adsorption equation**, अधिशोषण समीकरण

**adsorption isotherm**, अधिशोषण समतापरेषा

**adulterant**, *n.* अपमिश्र (पु.)

**adulterated**, *adj.* अपमिश्रित, भेसळयुक्त

***adulteration**, *n.* अपमिश्रण (न.), भेसळ (स्त्री.)

**adverse effect**, प्रतिकूल परिणाम

***adverse reaction**, प्रतिकूल प्रतिक्रिया

**advertising agency**, जाहिरात अभिकरण

**advertising and display**, जाहिरात व प्रदर्शन

**aeration**, *n.* (*also* **airing**) १ वायुवेशन (न.) २ वातन (न.)

**aerobic**, *adj.* वातापेक्षी

*cf.* anaerobic. वातनिरपेक्षी

**aerobic oxidation**, वातापेक्षी ऑक्सिडन

***aerosol**, *n.* १ एरोसॉल (पु.), सूक्ष्मफवारा (पु.), सूक्ष्मतुषार (पु.) २ सूक्ष्मतुषारित्र (न.)

**co-dispensing aerosol**, औषध-वितरणसहित सूक्ष्मतुषारित्र

**compressed gas aerosol**, संपीडित वायु सूक्ष्मतुषारित्र

**foam dispensing aerosol**, फेन वितरक सूक्ष्मतुषारित्र

**spray dispensing aerosol**, औषध सूक्ष्म-तुषारित्र

**aerosol producer**, सूक्ष्मतुषारित्र निर्माता

**aerosol propellant**, सूक्ष्मतुषार प्रणोदक

**affective disorder**, भावात्मक विकार

**afferent**, *adj.* अभिवाही

**affinity**, *n.* आसक्ति (स्त्री.)

**affinity chromatography**, आसक्ति वर्णलेखन

**afibrinogenaemia**, *n.* फायब्रिनोजेनहीनरक्तता (स्त्री.)

**afterload**, *n.* पश्चभार (पु.)

**after-taste**, *n.* पश्चात्रुचि (स्त्री.)

**agammaglobulinaemia**, *n.* अल्प गॅमाग्लोब्युलिन रक्तता (स्त्री.)

**agar-agar**, *n.* ॲगार-ॲगार (न.)

**agent**, *n.* कारक (पु.)

**agglomeration**, *n.* संपिंडन (न.)

**agglutination**, *n.* समूहन (न.), संश्लेषन (न.)

**agglutination test**, समूहन चाचणी

**aggravate**, *v.t.* विकोपाला नेणे, अधिक बिघडवणे

**aggregate**, *v.t.&i.* समुच्चय करणे, समुच्चय होणे

*n.* समुच्चय (पु.)

*adj.* समुच्चयित

**aggregation**, *n.* १ समुच्चयन (न.) २ समुच्चय (पु.)

**aggregation in emulsion**, पायस समुच्चयन

**aggregation number**, समूहातील कलिलकण संख्या, समूहांतर्गत कलिलकण संख्या

**aggregation rate**, समुच्चयन प्रमाण

**aggressiveness**, *n.* आक्रमकता (स्त्री.)

**aging**, *n.* १ जीर्णन (न.) २ कालप्रभावन (न.)

agitation, *n.* १ क्षोभ (पु.) २ क्षोभण (न.)
aglycone, *n.* ॲग्लायकोन (न.)
*agonist, *n.* प्रचालक (पु.)
**agranulocytosis**, *n.* कणहीनश्वेतकोशिकान्यूनता (स्त्री.)
air embolism, वायु अंतर्गुळिका
air filter, वात निस्यंदक, वात गाळणी
airing = aeration
air lock, १ वायु पाशन २ वायु पाश
air pollution, वायु प्रदूषण
**air recirculation**, वात पुनरभिसरण
air suspension coating, वात निलंबन विलेपन
*akathisia from antipsychotic drugs, मनोविकृतिरोधी औषधांमुळे होणारा अस्वस्थिरता
albumin binding, अल्ब्युमिन बंधन
albuminous seed, भ्रूणपोषी बीज
albuminuria, *n.* अल्ब्युमिनमेह (पु.), अल्ब्युमिनमूत्रता (स्त्री.)
alburnum, *n.* रसकाष्ठ (न.)
alcohol, *n.* अल्कोहोल (न.), मद्यार्क (पु.)
**alcohol abuse**, अल्कोहोलचा दुरुपयोग
alcoholic beverage, अल्कोहोली पेय, मद्यार्कयुक्त पेय
alcoholic cardiomyopathy, अल्कोहोलजन्य हृद्स्नायुविकृति
alcoholic goods, अल्कोहोली माल
**alcoholic neuritis**, अल्कोहोली चेतादाह
**alcoholic preparation**, अल्कोहोली सिद्ध पदार्थ, मद्यार्कजन्य पदार्थ
*Alcoholics' Anonymous, अल्कोहोलिक्स ॲनानिमस
***alcoholism**, *n.* मद्यात्यय (पु.), मद्यासक्ति (पु.)
alcopar, *n.* अल्कोपार (पु.)
alcuronium, *n.* अल्क्युरोनियम (न.)
aldehyde dehydrogenase, ॲल्डिहाइड डीहायड्रोजिनेज
**aldosterone**, *n.* अल्डोस्टेरॉन (न.)

aldosteronism, *n.* अल्डोस्टेरॉनता (स्त्री.)
**aldrin**, *n.* ऑल्ड्रिन (न.)
aleurone grain, सत्त्विता कणी
alfalfa, *n.* (lucerne) अल्फाल्फा (न.), लसूण घवत (न.)
**alginate** fibre, ॲल्जिनित तंतु
**alginate wool**, ॲल्जिनित लोकर
**alginic acid**, ॲल्जिनिक आम्ल
**aliphatic** alcohol, ॲलिफॅटिक अल्कोहोल
**aliquot** method of **weighing and measuring**, वजन-मापांची अंशविभाजक पद्धती, वजन-मापांची विभाजनी पद्धती
alkali, *n.* अल्क (पु.)
**alkalimetry**, *n.* अल्कमिति (स्त्री.)
alkaline, *adj.* अल्कधर्मी, अल्की, अल्क–
**alkalinisation = alkalisation**
alkalinity, *n.* अल्कधर्मिता (स्त्री.)
alkalisation, *n.* (*also* **alkalinisation**) अल्कलीकरण (न.), अल्कलीभवन (न.)
alkalisation of urine, मूत्राचे अल्कलीकरण
alkaloid, *adj.* अल्काभ
alkaloidal assay, अल्काभ आमापन
alkalosis, *n.* अल्कवृद्धि (स्त्री.)
**alkane**, *n.* अल्केन (न.)
alkylating agent, अल्किल मूलक दाता, अल्किल-दाता (पु.)
alkylation, *n.* अल्किलीकरण (न.), अल्कलीभवन (न.)
allergen, *n.* ॲलर्जीकारी (पु.)
**allergenic extract**, असात्म्यताकारी अर्क
allergenic potency, असात्म्यताकारी विभव
allergic, *adj.* ॲलर्जीजन्य, असात्म्य
**allergic dermatitis**, ॲलर्जीजन्य त्वचाशोथ, असात्म्यी त्वचाशोथ
**allergic diseases**, ॲलर्जीजन्य रोग (पु.अ.व.)
**allergist**, *n.* ॲलर्जीतज्ज्ञ (सा.), असात्म्यतादोषतज्ज्ञ (सा.)

***allergy,** *n.* ॲलर्जी (स्त्री.), असात्म्यता (स्त्री.)

***alligation,** *n.* प्रमिश्रण (न.)

**allometric equation,** अंग-अंगांग वृद्धिमितीय समीकरण

**allometry,** *n.* (relative growth of a part in regulation to an entire organism) अंग-अंगांग वृद्धिमिति (स्त्री.)

**all or none effect,** पूर्ण वा शून्य प्रभाव

**allosteric reaction,** समनुरूपण परिवर्तनकारी अभिक्रिया

**allotropy,** *n.* अपरूपता (स्त्री.)

**aloes,** *n.* कोरफड (स्त्री.)

**alopecia,** *n.* केशऱ्हास (पु.)

**alopecia areata.** चाई (स्त्री.)

**alpha-adrenergic receptor,** आल्फा-ॲड्रेनलिन ग्राही

**alpha decay,** आल्फा ऱ्हास

**alpha error,** आल्फा त्रुटि

**alpha radiation,** आल्फा प्रारण

**alveolar excretion,** वायुकोशीय उत्सर्जन

***amalgam filling,** पारदमिश्र भरण

**amber glass,** ॲम्बर काच

**amber resin,** ॲम्बर राळ, ॲम्बर रेझिन

**amblyopia,** *n.* मंददृष्टिता (स्त्री.)

**ambulatory patient,** (*also* out patient) हिंडता फिरता रोगी, बाह्यरुग्ण (पु.), चलनक्षम रुग्ण

**ambulatory patient care,** चलनक्षम रुग्ण दक्षता

**amebiasis,** *n.* अमीबारुग्णता (स्त्री.)

**amebic dysentery,** अमीबाजन्य आमांश

**amebicide,** *n.* अमीबानाशक (न.)

**amenorrhea,** *n.* अनार्तव (न.)

**amidase,** *n.* अमायडेज (न.)

**amino-aciduria,** *n.* ॲमिनो-आम्लमूत्रता (स्त्री.)

**ammoniated mercury ointment,** अमोनियायुक्त पारा-मलम

**amniotic fluid,** उल्बजल (न.), गर्भोदक (न.), गर्भजल (न.)

**amorphous drug,** अस्फटिकी औषध

**amorphous insulin zinc suspension,** अस्फटिकी इन्सुलिन जस्त निलंबन

**amorphous solid,** अस्फटिकी घनपदार्थ

**amperometric titration,** ॲम्पिअरमितीय अनुमापन

**amperometry,** *n.* ॲम्पिअरमिति (स्त्री.)

*** amphiphilic colloid,** (*also* called **association colloid**) उभयरागी कलिल

**amphiprotic solvent,** उभयप्रोटिक द्रावक, ॲम्फिप्रोटिक द्रावक

**ampholytic colloid** = **zwitterionic colloid**

**amphophil,** *n.* उभयरागी (पु.)

**amphoteric,** *adj.* उभयधर्मी

**amplitude,** *n.* आयाम (पु.)

***ampule,** *n.* (*also* ampoule) चंबुकी (स्त्री.), ॲम्पूल (स्त्री.)

**ampule file,** ॲम्पूल कानस, ॲम्पूल फाईल

**amylum,** *n.* अमायलम (पु.), पिष्टसत्त्व (न.)

**anabolic,** *adj.* उपचयी

**anabolic steroids,** उपचयी स्टेरॉइडे (न.अ.व.)

**anabolism,** *n.* उपचय (पु.)

**anabolism promotion,** उपचय प्रचालन

**anaemia,** *n.* (*also* anemia) पांडुरोग (पु.)

- **hemolytic anaemia,** लोहितपेशी विघटनी पांडुरोग
- **hyperchromic anaemia,** अतिवर्णी पांडुरोग
- **hypochromic anaemia,** अल्पवर्णी पांडुरोग
- **megaloblastic anaemia,** महापेशी पांडुरोग
- **microcytic anaemia,** लघुपेशी पांडुरोग
- **nutritional anaemia,** अपोषणजन्य पांडुरोग

**anaerobic** = **anerobic**

**anaesthesia,** *n.* (*also* anesthesia) बधिरीकरण (न.)

**anaesthetic,** *adj.* (*also* anesthetic) **अधिरक, बधिरकारी**
**anaesthetise,** *v.t.* (*also* anesthetise) **बधिर करणे**
***analeptic,** *adj.* **१ श्वसनोद्दीपक २ संजीवक**
**analgesia,** *n.* **वेदनाहरण** (न.)
**analgesic,** *adj.* **वेदनाहारी**
*n.* **वेदनाहर** (न.)
**analogue computer, सादृश्य संगणक**
**analyser,** *n.* **विश्लेषक** (पु.)
**analysis,** *n.* **विश्लेषण** (न.)
**analysis of variance, प्रचरण विश्लेषण**
**anaphase,** *n.* **पश्चावस्था** (स्त्री.)
**anaphylactic,** *adj.* **अपप्रतिरक्षी**
**anaphylactic shock, अपप्रतिरक्षी आघात**
**anaphylactoid,** *adj.* **अपप्रतिरक्षाभ**
***anaphylaxis,** *n.* **अपप्रतिरक्षा** (स्त्री.)
**anastomosis,** *n.* **संमीलन** (न.), **जोड** (पु.)
**anatomy,** *n.* **शारीर** (न.), **शरीररचनाशास्त्र** (न.)
**ancillary supplies, साहाय्यभूत पुरवठा**
**androgen,** *n.* **१ पुंजन** (पु.), **पुंजनक** (पु.) **२** (as, hormone) **पुंजन्य संप्रेरक** (पु.), **अँड्रोजेन** (पु.)
**androgenic action, पुं-जनी क्रिया**
**anemia** = **anaemia**
**anerobic,** *adj.* (*also* **anaerobic**) **वातनिरपेक्षी, विनॉक्सि–** *cf.* aerobic
**anerobic infection, विनॉक्सि संक्रमण, वातनिरपेक्षी संक्रमण**
**anerobic oxidation, वातनिरपेक्षी ऑक्सिडन**
**anesthesia** = **anaesthesia**
**anesthetic** = **anaesthetic**
**anesthetise** = **anaesthetise**
**angina index, शूल निर्देशांक**
**angina pectoris, उरःशूल** (पु.)
**angioedema,** *n.* **वाहिनी शोफ** (पु.)
**angiography,** *n.* *Radiology* **वाहिनीचित्रण** (न.)

**angioneurotic edema, वाहिनी-चेताजन्य शोफ**
**angiotensin converting enzyme, अँजिओटें-सिन-रूपांतरकारी विकर**
***angle of repose, १ विश्राम कोन २** (angle of friction) **घर्षण कोन**
**Angstrom unit, अँगस्ट्रॉम एकक**
**anhidrosis,** *n.* **अस्वेदता** (स्त्री.)
**anhidrotic,** *adj.* **१ स्वेदरोधी २ स्वेदनरोधी**
**animal,** *n.* **प्राणि** (पु.), **पशु** (पु.)
**animal experiment, प्राण्यांवरील प्रयोग**
**animal feed, पशुखाद्य** (न.)
**animal studies,** (experiments on animals) **१ प्राण्यांवरील प्रयोग २ प्राण्यांवरील परिणाम अभ्यास**
**anion,** *n.* **ॲनायन** (पु.), **ऋणायन** (न.)
**anion exchangers, ॲनायन विनिमयके** (न.अ.व.)
**anionic,** *adj.* **ॲनायनी**
**anionic emulsifying agent, ॲनायनी पायस-कारी पदार्थ, ॲनायनी पायसकारी द्रव्य**
**aniseed,** *n.* (*also* **anise fruit**) **बडीशेप** (स्त्री.), **शोप** (स्त्री.)
**aniso-,** (in comb.) **विषम–**
**anisotropic refractive index, विषमदैशिक अपवर्तनांक**
**anisotropy,** *n.* (*also* **anisotropism**) **विषम-दैशिकता** (स्त्री.)
**ankylosing,** *adj.* **दृढकारी**
**ankylosing spondylitis, दृढकारी कशेरु-संधिशोथ**
**annealing,** *n.* **अनुशीतन** (न.), **सावकाश निवळणे** (न.)
**anorectic,** *n.* **क्षुधानाशक** (न.)
**anorexia,** *n.* **क्षुधानाश** (पु.)
**anorexia nervosa, मनोजन्य क्षुधानाश**
**anorexiant,** *adj.* **क्षुधानाशक**
**anosmia,** *n.* **अघ्राणता** (स्त्री.)
**anovulatory cycle, डिंब अनुत्सारी चक्र**

**anoxemia**, *n.* अनॉक्सिरक्तता (स्त्री.), रक्तातील ऑक्सिजन्यूनता (स्त्री.)
**antacid**, *n.* प्रत्याम्ल (न.), आम्लरोधी (न.)
***antagonism**, *n.* विरोधिता (स्त्री.)
**antagonist**, *n.* विरोधी (पु.)
**ante–**, *pfx.* पूर्व
**antecedent**, *adj.* पूर्ववर्ती
**ante partum**, प्रसवपूर्व
**anterior**, *adj.* अग्र–
**anterior pituitary insufficiency**, अग्र पोयूषिका अपर्याप्तता
**anthelmintic**, *adj.* कृमिविरोधी
**anthelmintic action**, कृमिविरोधी क्रिया
**anthracosis**, *n.* (फुफ्फुस) कर्बकणता (स्त्री.)
**anti–**, *pfx.* प्रति–, –रोधी
**anti-acrodynia rat factor**=vitamin $B_6$
**anti-adherents**, *n. pl.* प्रति-आसंजके (न.अ.व.)
**antianaemia principle**, पांडुरोगरोधी द्रव्य
**antiandrogen**, *n.* पुंजनरोधी (पु.)
**antianxiety**, *adj.* चिंतारोधी
**antiarrhythmic**, *adj.* अतालतारोधी
**antibacterial**, *adj.* जीवाणुविरोधी, जंतुविरोधी
**antibacterial activity**, जीवाणुविरोधी व्याप्ति
**antibacterial agent**, जीवाणुविरोधी कारक, जंतुविरोधी कारक
**antibiotics**, *n. pl.* प्रतिजैविके (न.अ.व.)
**antibody**, *n.* प्रतिपिंड (पु.)
**antibonding molecular orbital**, प्रतिबंधी रेणु कक्षिका
**anticholinergic**, *adj.* प्रतिकोलिनधर्मी
**anticoagulant**, *n.* साकळणरोधी (पु.) *adj.* साकळणरोधी
**anticonvulsant property**, आकडीरोधी गुणधर्म
**antidepressant**, *n.* प्रतिअवसादी (पु.)
**antidiarrheal**, *adj.* रेचनरोधी, अतिसाररोधी
**antidiuresis**, *n.* प्रतिमूत्रलता (स्त्री.)
**antidiuretic**, *adj.* प्रतिमूत्रल
**antidiuretic hormone**, प्रतिमूत्रल संप्रेरक
***antidote**, *n.* विषघ्न (न.), उतारा (पु.), विषरोधी (न.)
**antieczematous agent**, इसबरोधी औषध, इसबप्रतिरोधक (न.), इसबप्रतिरोधी (न.)
**antiemetic**, *adj.* वांतिरोधी
**antiepileptic**, *n.* अपस्माररोधी (न.) *adj.* अपस्माररोधी
**antiestrogen**, *n.* प्रतिइस्ट्रोजन (न.), इस्ट्रोजनरोधी (न.)
***antifatigue test**, श्रांतिरोध चाचणी
**antifibrinolytic drugs**, फायब्रिनलयनरोधी औषधे (न.अ.व.)
**antifoaming agent**, फेननाशक (न.), फेनरोधी (पु.)
**antifoams**, *n. pl.* प्रतिफेन (न.अ.व.)
**antifungal**, *adj.* कवकरोधी, प्रतिकवकी
**antigen**, *n.* प्रतिजन (न.)
**antigen–RNA complex**, प्रतिजन-आरएनए संकुल
**antigen transplantation**, प्रतिजन प्रतिरोपण
**antihaemophilic globulin**, प्रतिहिमोफिलिक ग्लोब्युलिन
**antihemorrhagic**, *adj.* रक्तस्रावरोधी
**antihistamine**, *n.* प्रतिहिस्टॅमिन (न.)
**antihypertensive**, *adj.* अतिरक्तदाबरोधी
**anti-infective**, *adj.* संसर्गरोधी
**anti-inflammatory**, *adj.* शोथरोधी
**antilipolytic action**, वसालयनरोधी क्रिया
**antilog**, *n.* (antilogarithm) प्रतिलघु (पु.)
**antilogarithm**, *n.* (antilog) प्रतिलघु (पु.)
**antilymphocytic serum**, लसीका प्रतिरक्तद्रव
***antimetabolite**, *n.* १ प्रतिचयापचयज (न.) २ प्रतिचयापचयक (पु.)
**antimicrobial**, *adj.* प्रतिसूक्ष्मजीवी *n.* प्रतिसूक्ष्मजैविक (न.)
**antimicrobial agent**, प्रतिसूक्ष्मजीवी कारक

**anti-obesity agent,** स्थूलतारोधक (पु.)
**antioxidant,** *adj.* ऑक्सिडनरोधी
**antiparkinsonian,** *adj.* प्रतिपार्किन्सनी
**antiperspirant,** *adj.* स्वेदनरोधी, स्वेदरोधी
**antipolymeric action,** प्रतिबहुवारिक क्रिया
**antiprothrombin,** *n.* प्रतिप्रोथ्रॉबिन (न.)
**antipsychotic,** *adj.* मनोदुर्दशारोधी–
**antipsychotic agent,** मनोदुर्दशारोधी द्रव्य
**antipyretic,** *n.* ज्वरहर (न.)
*adj.* ज्वरहारी
**antirachitic,** *adj.* मुडदूसरोधी
**antiseborrheic,** *adj.* त्वग्वसास्रावरोधी
**antisecretory,** *adj.* प्रतिस्रावी
**antiseptic,** *adj.* पूतिरोधी
**antiserum,** *n.* प्रतिसीरम (स्त्री.), प्रति-रक्तलस (स्त्री.)
**antispasmodic,** *adj.* स्नायु-संकोचरोधी
**antistatic additive,** प्रतिस्थितिक समावेशी
***antithixotropy,** *n.* प्रतिथालप्रवाहिता (स्त्री.)
**antithrombin,** *n.* थ्रॉबिनरोधी (न.), प्रति-थ्रॉबिन (न.)
**antithrombin action,** थ्रॉबिनरोधी क्रिया
**antithromboplastin,** *n.* थ्रॉबोप्लास्टिनरोधी (न.)
**antithrombotic,** *adj.* प्रतिक्लथनी, घनास्त्ररोधी
**antithymocytic,** *adj.* प्रतिउरोधिष्ठग्रंथि–
**antithyroid,** *adj.* अवटुरोधी
**antitoxin,** *n.* प्रतिजीवविष (न.)
***antitussive,** *adj.* कासरोधी (कास = cold)
**antivenin,** *n.* (*also* antivenene) प्रति-सर्पविष (न.) (विषारी सर्प आणि कीटक दंशावरील प्रतिरोधक रक्तलस)
**antiviral,** *adj.* विषाणुरोधी
**anxiety,** *n.* चिंता (स्त्री.)
**anxiety state,** चिंतातुरता (स्त्री.)
***aperient,** *n.* सौम्य रेचक (न.)
**aphasia,** *n.* वाचाघात (पु.)
**aphrodisiac,** *adj.* वाजीकर, कामोत्तेजक
**aplastic anaemia,** अविकसनी पांडुरोग
**apnoea,** *n.* (*also* apnea) अश्वसन (न.)
**apothecaries' system of weights,** ॲपोथेकरी वजन पद्धति
**apparatus,** *n.* उपकरण (न.), यंत्रणा (स्त्री.)
**apparent,** *adj.* आभासी
**apparent density,** आभासी घनता
**apparent volume of distribution** = **fictive volume of distribution**
**apparent zero-order,** आभासी शून्य कोटि
**appetiser,** *n.* क्षुधावर्धक (न.)
**appetite,** *n* क्षुधा (स्त्री.)
**appetite stimulants,** क्षुधावर्धके (न.अ.व.)
**appetite suppressants,** क्षुधाऱ्हासके (न.अ.व.)
**applicator,** *n.* १ विक्षेपक (पु.) २ योजित्र (न.) (as in : radium applicator रेडिअम योजित्र)
**apprentice pharmacist,** शिकाऊ औषधनिर्माता
**approval of institution,** संस्थेची मान्यता
**approval of institution for analysis,** विश्लेषणासाठी संस्थामान्यता
**approximation,** *n.* निकटन (न.)
**apricot kernel,** जरदाळू गाभा
**aprotic solvent,** ॲप्रोटिक द्रावक
***aquametry,** *n.* जलमिति (स्त्री.)
**aqueous,** *adj.* जलीय
**aqueous injection,** जलीय अंतःक्षेपण
**Arabian senna,** अरेबिअन सोनामुखी
**arachnoiditis,** *n.* जालआवरणशोथ (पु.)
**araroba,** *n.* ॲरारोबा (पु.)
**arbitrary,** *adj.* स्वेच्छ
**arbutin,** *n.* आर्बुटिन (न.)
**areas under curves,** वक्रांकित क्षेत्रे (न.अ.व.) (अंकित = खालील)
**areca nut,** सुपारी (स्त्री.), पोफळ (स्त्री.)

**argyria**, *n.* रजतमयता (स्त्री.)
**arithmetic mean**, गणित मध्य
**arnica**, *n.* आर्निका (स्त्री.)
**aromatic ammonia spirit**, ॲरोमॅटिक अमोनिआ स्पिरिट
**aromatics**, *n. pl.* ॲरोमॅटिक संयुगे (न.अ.व.)
**aromatic water**, सुवासिक पाणी
**arrest**, *n.* संरोध (पु.)
**Arrhenius equation**, ॲऱ्हेनिअस समीकरण
**arrowroot**, *n.* आरारूट (न.)
**arteriography**, *n.* धमनीचित्रण (न.)
**arteriole**, *n.* धमनिका (स्त्री.)
**arteriosclerosis**, *n.* धमनीकाठिण्य (न.)
**artery**, *n.* धमनी (स्त्री.)
**arthralgia**, *n.* संधिवेदना (स्त्री.)
**arthritis**, *n.* संधिशोथ (पु.) (as in : osteoarthritis अस्थिसंधिशोथ)
**Arthus reaction**, आर्थस प्रतिक्रिया
**artificial**, *adj.* कृत्रिम
**artificial respirator**, कृत्रिम श्वसनित्र
**asafoetida**, *n.* हिंग (पु.)
**ascending limb**, आरोही अवयव, आरोही भाग
**ascites**, *n.* जलोदर (पु.)
**aseptic drying**, अपूतिक शुष्कन
**aseptic laboratory**, अपूतिक प्रयोगशाळा
**aseptic process**, अपूतिक प्रक्रिया
**aseptic production**, अपूतिक उत्पादन
**aseptic technique**, अपूतिक तंत्र, पूतिरहित तंत्र
**ash value**, रक्षा मूल्य
**aspiration**, *n.* चूषण (न.)
**aspiration bronchopneumonia**, चूषणजन्य श्वसनी–फुफ्फुसशोथ
**aspiration pneumonitis**, चूषणजन्य फुफ्फुसशोथ
**aspirator**, *n.* चूषित्र (न.)
**aspirin**, *n.* ॲस्पिरिन (न.)
**Assam musk**, कस्तुरी (स्त्री.)
***assay**, *n.* १ निकषमूल्यन (न.) २ आमापन (न.)
**assay and quality control division**, निकषमूल्यन व गुणनियंत्रण विभाग
**assign score**, गुण देणे
**associated**, *adj.* संबद्ध
**association**, *n.* १ साहचर्य (न.) २ संयोजन (न.)
***association colloid**, (*also* called amphiphilic colloid) संयोजन कलिल
**asthma**, *n.* दमा (पु.), अस्थमा (पु.)
**astringent**, *adj.* कषाय, तुरट
*n.* कषाय (न.)
**asymmetry potential**, असममिति विभव
**asystolic**, *adj.* असंकुंचनी
**atactic**, *adj.* अव्यवस्थ (रेणू रचनेच्या संदर्भात)
***ataxia**, *n.* गतिविभ्रम (पु.)
**atelectasis**, *n.* १ फुफ्फुस निमीलन (न.) २ फुफ्फुस अनुन्मीलन (न.)
**atheroma**, *n.* करंभार्बुद (पु.)
**atherosclerosis**, *n.* ॲथेरोकाठिण्य (न.), करंभकाठिण्य (न.)
**atmospheric pressure**, वातावरणीय दाब
**atomic**, *adj.* अणु–, आण्वीय
**atomic absorption analysis**, अणु-अवशोषण विश्लेषण
**atomic bond**, आण्विक बंध
**atomic fission**, अणु विखंडन
**atomic mass unit**, अणु वस्तुमान एकक
**atomic nucleus**, अणु केंद्रक
**atomic number**, अणु अंक
**atomic orbital**, अणु कक्षिका
**atomic refraction**, अणु अपवर्तन
**atomic weight**, अणुभार (पु.)
**atomiser**, *n.* सूक्ष्मतुषारक (पु.)
**atresia**, *n.* अविवरता (स्त्री.), अच्छिद्रता (स्त्री.)

**atrial**, *adj.* अलिंदी, अलिंद–
**atrial fibrillation**, अलिंदी विकंपन
**atrial flutter**, अलिंद आस्फालन, अलिंद स्फुरण
**atrioventricular node**, अलिंदनिलय पर्वसंधि
**atrophic**, *adj.* अपुष्टि–, शोष–, शोषकर
**atrophic vaginitis**, अपुष्टि- योनिशोथ (पु.)
**atrophy**, *n.* अपुष्टि (स्त्री.), शोष (पु.)
**attack**, *n.* आवेग (पु.), झटका (पु.)
**attenuated micro-organisms**, दुर्बलित सूक्ष्मजीव (पु.अ.व.), दुर्बलित सूक्ष्मजंतु (पु.अ.व.)
**attenuation**, *n.* दुर्बलीकरण (न.), क्षीणन (न.), सौम्यीकरण (न.)
**attenuator**, *n.* दुर्बलकारी (पु.)
**attractive potential**, आकर्षी विभव
**attrition mill**, घर्षण दळणयंत्र
**atypical**, *adj.* प्ररूपबाह्य
**atypical infection**, प्ररूपबाह्य संक्रमण
**Auger electron**, ऑगर इलेक्ट्रॉन (क्षिप्त इलेक्ट्रॉन)
**augmented diffusion**, आवर्धित विसरण
**aurinarium**, *n.* कर्णवर्तिका (स्त्री.)
**Australian sandarac**, ऑस्ट्रेलियन सँडरॅक
**autacoid**, *n.* आत्मागद (पु.)
**autoanalyser**, *n.* स्वयंविश्लेषित्र (न.)
**autocatalysis**, *n.* स्वयंउत्प्रेरण (न.)
**autocatalytic**, *adj.* स्वयंउत्प्रेरक
**autochrome**, *n.* वर्णवर्धक (पु.)
**autoclave**, *n.* ऑटोक्लेव (पु.)
**autoclaving**, *n.* ऑटोक्लेवन (न.)
**autocytometer**, *n.* (meter for studying cell structures) स्वयंपेशिकामापी (पु.)
**autofluoroscope**, *n.* स्वयंप्रतिदीप्तिदर्शी (पु.)
**auto-immune**, *adj.* स्वयं-प्रतिक्षम
**auto-immune disease**, स्वयं-प्रतिक्षम रोग
**auto-immune thyroiditis**, स्वयं-प्रतिक्षम अवटुशोथ
**auto-induction**, *n.* स्वयंप्रेरण (न.)
**autolysis**, *n.* स्वयंलयन (न.)
**automated process control**, स्वयंचलित प्रक्रिया नियंत्रण
**automatic data processing**, स्वयंचलित आधारसामग्री संस्करण
**automation**, *n.* स्वयंचलन (न.)
**autonomic effector**, स्वायत्त परिणामक
**autonomic nervous system**, स्वायत्त चेता संस्था
**auto-oxidation**, *n.* (*also* **autoxidation**) स्वयं-ऑक्सिडन (न.)
**auto-oxidation reaction**, स्वयं-ऑक्सिडन अभिक्रिया
**auto-oxidative reaction**, स्वयं-ऑक्सिडनी अभिक्रिया
**autoprotolysis**, *n.* स्वयंप्रोटॉन हस्तांतरण (न.)
**autoprotolysis constant**, स्वयंप्रोटॉन हस्तांतरण स्थिरांक
**autopsy** = **necropsy**
**autoradiograph** = **radioautograph**
**autoradiography**, *n.* स्वयंकिरणोत्सारचित्रण (न.)
**auto-regulation**, *n.* स्वयंनियमन (न.)
**autosomal dominant**, अलिंगी प्रभावी
**autosomal recessive**, अलिंगी अप्रभावी
**autosome**, *n.* अलिंगी गुणसूत्र (न.)
**autotroph**, *n.* स्वयंपोषी (पु.)
**autoxidation** = **auto-oxidation**
**autumn crocus**, हेमंतीय क्रोकस
**auxochrome**, *n.* वर्णवर्धक (पु.)
**auxotonic lever**, विशिष्ट प्रकारची तरफ
**available over the counter**, खुल्या विक्रीसाठी उपलब्ध
***aversion therapy**, विमुखता उपचार, अपवर्जन उपचार

aversive threshold, विमुखता प्रभावसीमा

Ayurvedic and Unani Drugs, आयुर्वेदीय आणि युनानी औषधे (न.अ.व.)

azeotrope, *n.* (*wrt* boiling point of solutions) सहबाष्पी (पु.)

azeotropic distillation, सहबाष्पी ऊर्ध्वपातन

azeotropic mixture, सहबाष्पी मिश्रण

azotaemia, *n.* नत्ररक्तता (स्त्री.)

azotometer, *n.* ॲझोटोमीटर (न.), नत्रमापक (न.)

# B

bacillary dysentery, दंडाणुजन्य आमांश

bacillus, *n.* दंडाणु (पु.)

background radiation, पार्श्वप्रारण (न.)

bacteraemia, *n.* (*also* bacteremia; bacteremic shock *or* bacteriemic shock) जीवाणुरक्तता (स्त्री.), जीवाणुरक्ती आघात (पु.)

bacteremia = bacteraemia

bacteria, *n. pl.* (*sing.* bacterium) जीवाणू (पु.अ.व.), बॅक्टेरिआ (पु.अ.व.)

bacterial filter, (*also* bacteria-proof filter) जीवाणु (निरोधक) गाळणी

bacterial growth phase lag, जीवाणुवृद्धि पश्चता प्रावस्था

bacterial insult, जीवाण्वीय आघात

bacterial spore, जीवाण्वीय बीजाणु

bacterial stain, जीवाणु अभिरंजन

bacterial strain, जीवाणु प्रभेद

bacterial vaccine, जीवाणु लस

bacterial variation, जीवाणु विभेद

bacteria-proof filter = bacterial filter

bactericidal, *adj.* जीवाणुनाशी

bactericidal activity assessment, जीवाणुनाशी क्रिया-निर्धारण

bactericidal mist, जीवाणुनाशी मिहिका

bactericide, *n.* जीवाणुनाशक (न.)

bacteriemic shock = bacteraemia

*bacteriological cure, जीवाण्वीय रोगमुक्ति

bacteriological purity test, जीवाणुशून्यता चाचणी

bacteriolysin, *n.* जीवाणु-विलायक (न.)

bacteriophage, *n.* जीवाणुभक्षी (पु.)

bacteriophrenic, *adj.* जीवाणु विरंडवर्धी

bacteriostat, *n.* जीवाणुरोधी (पु.)

bacteriostatic, *adj.* जीवाणुरोधी–

bacteriostatic activity assessment, जीवाणुरोधी क्रिया-निर्धारण

bacteriostatic agent, जीवाणुरोधी कारक

bacterium, *n.* (*pl.* bacteria) जीवाणु (पु.), बॅक्टेरिअम (पु.)

bacteriuria, *n.* जीवाणुमूत्रता (स्त्री.), जीवाणुमेह (पु.)

bacteroid, *n.* जीवाणुसदृशी (पु.)

baffle, *n.* अडथळा (पु.), व्यारोध (पु.)

balance, *v.t. & i.* संतुलन करणे, तोलणे *n.* १ संतुलन (न.), समतोल (पु.) २ तुला (स्त्री.), तराजु (पु.)

ball float, तरण गोलक

ball mill, गोलक चक्की, गोलक दळणयंत्र, बॉल मिल

*balsam, *n.* बालसम (पु.) (सुगंधी वृक्ष-निर्यास)

percolate, *v.i.* झरणे, झिरपणे, पाझरणे *n.* पाझर (पु.)
*percolation, *n.* झरण (न.), झिरपण (न.)
percutaneous, *adj.* त्वचेद्वारा
percutaneous absorption, त्वचेद्वारा शोषण
perforated basket centrifuge, छिद्रित करंडक केंद्रोत्सारक
perfume, *n.* (substance) सुगंधी द्रव्य (न.)
perfusate, *n.* निविष्ट द्रव (पु.)
perfuse, *v.t.* द्रवनिवेशन करणे
perfusion, *n.* द्रवनिवेशन (न.)
perfusion fluid, (*also* infusion fluid) निवेशन द्रव
pericardial, *adj.* हृदावरण–
pericarditis, *n.* हृदावरणशोथ (पु.)
peridural, *adj.* परिदृढी, परिदृढावरण–
peridural anaesthesia = extradural anaesthesia
perifollicular haemorrhage, परिपुटक रक्तस्राव
periodic paralysis, कालिक अंगघात
periodic table, आवर्त सारणी, आवर्ती सारणी
periodontal, *adj.* परिदंत–
perioral tremor, परिमुख कंप
peripheral, *adj.* परिधीय
peripheral neuritis, परिधीय चेताशोथ
peripheral resistance, परिधीय अवरोध
peripheral utilisation of glucose, ग्लुकोजचे परिधीय उपयोजन
peripheral vascular disease, परिधीय वाहिनी रोग
perishable, *adj.* नाशिवंत, नासणारा
*peritoneal dialysis, उदरच्छदी अपोहन
peritoneal fluid, उदरच्छदीय द्रव
permeability, *n.* पार्यता (स्त्री.)
permeable, *adj.* पार्य
permeation, *n.* पारण (न.), पारगमन (न.)
permissible, *adj.* अनुज्ञेय
*permissive effects, अनुज्ञेय परिणाम (पु.अ.व.)
*permissiveness, *n.* अनुज्ञेयता (स्त्री.)
permissive role, अनुज्ञापक भूमिका
permitted colour, अनुज्ञात रंग, अनुज्ञात रंजक
permitted error, अनुज्ञेय त्रुटि
permittivity, *n.* परावैद्युतांक (पु.)
pernicious anaemia, (*also* called Addisonian anaemia) अॅडिसनी पांडुरोग
perpetual inventory record, अखंड वस्तु अभिलेख
persistence factor, सातत्य घटक
persorption, *n.* परिशोषण (न.)
pertussis, *n.* डांग्या खोकला (पु.)
*pessary, *n.* पेसरी (स्त्री.), सोंगटी (स्त्री.)
pesticide, *n.* कीटनाशक (न.)
pestle, *n.* बत्ता (पु.)
petechia, *n.* रक्तचिह्नक (न.)
petit mal, अल्पकाली अपस्मार
petri dish, संवर्ध तश्ती
petrolatum, *n.* पेट्रोलॅटम (न.)
petrolatum gas, पेट्रोलॅटम गॅस
petroleum jelly, पेट्रोलिअम जेली
phagocyte, *n.* भक्षकपेशी (स्त्री.)
phagocytosis, *n.* पेशीय भक्षण (न.)
pharmaceutical aids, औषधनिर्माण साहाय्यके (न.अ.व.)
Pharmaceutical Enquiry Committee Report, औषधनिर्माण विषयक चौकशी समितीचा अहवाल
pharmaceutical formula, औषधीय सूत्र
pharmaceutical formulation, औषधीय सूत्रीकरण
pharmaceutical inhalant, औषधी श्वास्य
*pharmaceutics, *n.* औषधनिर्माणविद्या (स्त्री.)
pharmacist, *n.* १ औषधनिर्माता (पु.) २ औषधतज्ज्ञ (पु.)
pharmacist's oath, औषधनिर्मात्याची शपथ

*pharmacodynamics, *n.* औषधगतिकी (स्त्री.)

pharmacogenetic disease. औषध आनुवंशिक रोग

*pharmacogenetics, *n.* औषध आनुवंशिकी (स्त्री.)

*pharmacognosy, *n.* औषधअभिज्ञान (न.)

pharmacokinetic model, औषध बलगतिकी प्रतिमान

*pharmacokinetics, *n.* औषध बलगतिकी (स्त्री.)

pharmacokinetic tolerance, (*also* called dispositional tolerance) औषध बलगतिकी सह्यता

pharmacological effect, औषधीय परिणाम

pharmacological property, औषधशास्त्रीय गुणधर्म

pharmacology, *n.* औषधशास्त्र (न.)

*pharmacopoeia, *n.* अधिकृत औषधनिघंटु (पु.)

pharmacotherapeutics, *n.* औषधोपचारशास्त्र (न.)

*pharmacy, *n.* १ औषधनिर्माणशास्त्र (न.) २ औषधनिर्माणशाळा (स्त्री.)

Pharmacy Act, 1948, औषध व्यवसाय अधिनियम, १९४८

Pharmacy and Therapeutic Committee, औषधतज्ज्ञ व उपचारतज्ज्ञ समिति

Pharmacy Council of India, फार्मसी कौन्सिल ऑफ इंडिया

pharyngeal, *adj.* ग्रसनी–

phase, *n.* १ प्रावस्था (स्त्री.) २ कला (स्त्री.)

phase contrast microscope, प्रावस्था वैधर्म्य सूक्ष्मदर्शक

phase diagram, प्रावस्था आकृति

phase equilibria, प्रावस्था समतोल

*phase inversion, प्रावस्था व्यस्तन

phase inversion temperature, प्रावस्था व्यस्तन तापमान

phase ratio, प्रावस्था गुणोत्तर

phase rule, प्रावस्था नियम

phase separation = coacervation

phase volume, प्रावस्था आकारमान

phellogen, *n.* त्वक्जनक (पु.)

phenomena, *n. pl.* (*sing.* phenomenon) घटना (स्त्री.अ.व.)

phenomenal growth, असाधारण वृद्धि

phenomenon, *n.* (*pl.* phenomena) घटना (स्त्री.)

phenotype, *n.* दृश्यरूप (न.), विशेषरूप (न.)

pheochromocytoma, *n.* वर्णरागीपेशी-अर्बुद (पु.)

pheromone, *n.* कामगंध (पु.)

phlebitis, *n.* नीलाशोथ (पु.)

phlyctenular – conjunctivitis, स्फोटयुक्त नेत्रश्लेष्मलाशोथ

phobia, *n.* भयगंड (पु.)

phobic anxiety state, भयगंडज चिंतातुरता

phobophobia, *n.* भीतिभयगंड (पु.)

phosphogluconate dehydrogenase, फॉस्फोग्लुकोनेट डिहायड्रोजिनेज

photoactometer, *n.* प्रकाश-क्रियाआमापी (पु.)

photoallergic reaction, प्रकाश-ॲलर्जी प्रतिक्रिया

photocell, *n.* प्रकाशघट (पु.)

photochemical equivalence, प्रकाश-रासायनिक समतुल्यता

photochemical reaction, प्रकाश-रासायनिक अभिक्रिया

photocurrent, *n.* प्रकाशविद्युत-धारा (स्त्री.)

photodegradative reaction, प्रकाश-अपक्रमण अभिक्रिया

photodynamic action, प्रकाशगतिक क्रिया

photoelastic, *adj.* प्रकाश-प्रत्यास्थ–

photoelastic fringe pattern, प्रकाश-प्रत्यास्थ सीमावृद्धि आकृतिबंध

photoelectric effect, प्रकाशविद्युत परिणाम

**photogenic reaction**, प्रकाशजन्य प्रतिक्रिया
**photolysis**, *n.* प्रकाश-अपघटन (न.)
**photometric assay**, प्रकाशमितीय आमापन
**photon**, *n.* फोटॉन (पु.)
**photophobia**, *n.* प्रकाश भयगंड (पु.)
**photoreactivation**, *n.* प्रकाश पुनर्सक्रियण (न.)
**photoscan**, *n.* प्रकाशक्रमवीक्षण (न.)
***photosensitiser**, *n.* प्रकाश संवेदिताकारक (न.)
**photosensitivity**, *n.* प्रकाशसंवेदिता (स्त्री.)
**photosynthesis**, *n.* प्रकाशसंश्लेषण (न.)
**phototoxic reaction**, प्रकाश-विषाक्त अभिक्रिया
**physical**, *adj.* शारीरिक, भौतिक–
***physical dependence**, शारीरिक अवलंबिता
**physical examination sheet**, शारीरिक तपासणी पत्र
**physical incompatibility**, भौतिक असंयोज्यता
**physical nature**, १ शारीरिक स्वरूप २ भौतिक स्वरूप
***physical pharmacy**, भौतिकी औषधनिर्माणशास्त्र
**physical plant**, भौतिक संयंत्र
**physical stability**, भौतिक स्थैर्य
**physician order sheet**, डॉक्टर आदेश पत्र
**physico-chemical properties**, भौतिक–रासायनिक गुणधर्म (पु.अ.व.)
**physics of compression**, संपीडन भौतिकी
**physiological**, *adj.* शरीरक्रियाशास्त्रीय, शरीरक्रियात्मक
**physiological action**, प्राकृत क्रिया
***physiological antagonism**, कार्यात्मक विरोधिता
**physiological function**, शरीरक्रिया (स्त्री.)
**physiologic availability** = **bioavailability**
**physisorption**, *n.* भौतिक शोषण (न.)
***picking**, *n.* १ निंदणी (स्त्री.) २ दाबक आसंजन (न.)
**piercing machine**, वेधनयंत्र (न.)
**pigment**, *n.* वर्णक (पु.)
**pigmentation of skin**, त्वचा रंजकन, त्वचा रंजन
**pile**, *n.* न्यूक्लीय विक्रियाधानी (स्त्री.)
**pill**, *n.* गोळी (स्त्री.) *cf.* tablet
**pill tile**, गोळी फरशी
**piloreaction**, *n.* रोमांचन (न.)
***pilot plant**, पथदर्शी संयंत्र
**pilot study**, १ पथदर्शी संशोधन २ पथदर्शी अभ्यास
**pin mill**, पिन मिल
**pinocytosis**, *n.* पेशिकीय द्रवप्राशन (न.), पेशीय प्राशन (न.)
**pi orbital**, पाय कक्षिका
**piston**, *n.* पिस्टन (पु.), दट्टचा (पु.)
**pithing**, *n.* चेतासंस्था नाशन (न.)
**Pitkin menstruum**, पिट्किन विलायक
**Pitot tube**, पिटॉट नलिका, पिटॉट दचुत
**pituitary dwarfism**, पियूषिका वामनता
**pituitary shock**, पियूषिका आघात
**pK**, (*see* **dissociation constant**) पीके
***placebo**, *n.* तोषक (न.)
**placenta**, *n.* अपरा (स्त्री.)
***placental barrier**, अपरा अवरोध
**placental lactogen**, अपरा दुग्धजनक
**placental transfer**, अपरा पारगमन
**plague vaccine**, प्लेगची लस
**planetary mixer**, ग्रहगतिसम मिश्रणी
**planimeter**, *n.* क्षेत्रमापी (पु.)
**plasma**, *n.* १ (as, of blood) रक्तद्रव (पु.) २ (as, of cell) जीवद्रव्य (न.)
**plasma co-factor**, रक्तद्रव सहघटक
**plasma concentration**, जीवद्रव्य संहति
**plasma expander**, (*also* **plasma extender**) रक्तद्रव वर्धक
**plasma phoresis**, *n.* रक्तद्रवनिरसन (न.)
**plasma protein**, प्लाझ्मा प्रथिन

**plasma protein fraction,** रक्तद्रव प्रथिनांश
**plasma substitute,** रक्तद्रव पर्यायी
**plasma thromboplastin antecedent,** रक्तद्रवगत थ्राम्बोप्लास्टिन पूर्ववर्ती
**plasmid,** *n.* प्लाझ्मिड (न.)
**plasminogen,** *n.* प्लाझमिनोजेन (पु.)
***plasmodium vivax,*** (*short form p. vivax*) प्लाझ्मोडिअम वायवॅक्स
**-plast,** (in comb.) —लवक
**plaster,** *n.* पटलेप (पु.), प्लास्टर (न.) *cf.* ointment
**plastic flow,** निग प्रवाह
**plasticiser,** *n.* आकार्यता सहायक (न.)
**plastic ring,** आकार्य वलय
**plate column,** पट्टिका स्तंभ
**platelet aggregation,** रक्तबिंबिका समुच्चयन
**platelet cohesion,** रक्तबिंबिका संसंजन
**platelet factor,** रक्तबिंबिका घटक
**plating method,** विलेपन पद्धति
**pleural,** *adj.* फुफ्फुसावरण—
**pleurisy,** *n.* (*also* pleuritis) प्लुरसी (स्त्री.), फुफ्फुसावरण शोथ (पु.)
**plot a curve,** वक्र अभिरेखन
**plot a graph,** आलेख अभिरेखन
**plugging,** *n.* निगन (न.), गुडदीयन (न.)
**plunger and vacuum crimper,** (collapsible tube fitting apparatus) मुसळी-निर्वाती घडीयंत्र
**pneumatic drying system,** वायवीय शुष्कन पद्धति
**pneumatic tube system,** वातिक नलिका पद्धति
**pneumonitis,** *n.* फुफ्फुसशोथ (पु.)
**podiatry**=**chiropody**
**point,** *n.* बिंदु (पु.), अंक (पु.)
**pointer,** *n.* दर्शक काटा (पु.), संकेतक (पु.)
**poise,** *n.* पॉइझ (न.) (विष्यंदितेचे परिमाण)
**poison,** *v.t.* १ विषप्रयोग करणे २ अभिक्रिया-नाशन करणे
**Poisons Act, 1919,** विषद्रव्य अधिनियम, १९१९
**polar,** *adj.* ध्रुवीय
**polar effect,** ध्रुवीय परिणाम
**polarised,** *adj.* ध्रुवित, ध्रुवीकृत
**polarity,** *n.* ध्रुवता (स्त्री.)
**polar molecular bond,** ध्रुवीय रेणु-बंध
**polarography,** *n.* ध्रुवतालेखन (न.)
**polaroid filter,** पोलॅरॉइड निस्यंदक, ध्रुवक निस्यंदक
**polishing,** *n.* चकाकीकरण (न.)
**pollinosis,** *n.* परागजन्य रोग (पु.)
**polyamide material,** पॉलीअमाइड पदार्थ
**polyarteritis nodosa,** गाठाळ परिधमनी शोथ
**polycarbonate,** *n.* पॉलीकार्बोनेट (न.)
**polycycle base,** बहुवलयी आधारद्रव्य
**polycythemia vera,** बहुलोहितपेशी रक्तता
**polydipsia,** *n.* बहुतृष्णा (स्त्री.)
**polyene antibiotics,** पॉलीइन प्रतिजैविके (न.अ.व.)
**polyester,** *n.* पॉलीएस्टर (न.)
**polyethylene,** *n.* पॉलीइथिलिन (न.)
**polyethylene glycol,** पॉलीइथिलिन ग्लायकॉल
**polymer,** *n.* बहुवारिक (न.)
**polymerisation,** *n.* बहुवारिकन (न.)
**polymorph,** *n.* बहुरूप (न.)
***polymorphism,** *n.* १ बहुरूपता (स्त्री.) २ बहुआकृतिकता (स्त्री.)
**polyneuritis,** *n.* बहुचेताशोथ (पु.)
**polypeptide,** *n.* पॉलीपेप्टाइड (न.), बहुपेप्टाइड (न.)
**polypeptide antibiotics,** पॉलीपेप्टाइड-प्रतिजैविके (न.अ.व.)
**polyphagia,** *n.* बहुक्षुधा (स्त्री.)
**polyprotic acid,** पॉलीप्रोटिक आम्ल
**polyunsaturated fat,** बहु-असंपृक्त मेद
**polyuria,** *n.* बहुमूत्रता (स्त्री.)
**pool boiling,** संचय उत्कलन

population therapy, लोकोपचार पद्धति
porcelain filter, चिनीमाती-गाळणी (स्त्री.)
porcine insulin, सूकर-इन्सुलिन, सौकर इन्सुलिन
pore penetration, छिद्र वेधन (न.)
pore size, छिद्र आकार, रंध्र आकार
porosity, *n.* सच्छिद्रता (स्त्री.)
porphyria, *n.* पॉर्फिरिआ (पु.), पॉर्फिरिनता (स्त्री.)
portal circulation, प्रतिहारी अभिसरण
position isomer, स्थान समघटक
positive, *adj.* १ धन २ भावात्मक
positive chronotropic action, गतिवर्धनी क्रिया
positive displacement pump, अधि-विस्थापन पंप
positive dromotropic action, वेगवर्धनी क्रिया
positive inotropic action, बलवर्धनी क्रिया
positive mixing, स्थिर मिश्रजन, स्थिर मिश्रण क्रिया
positron, *n.* पॉझिट्रॉन (पु.)
posological table, मात्रा कोष्टक
posology, *n.* औषधमात्राशास्त्र (न.)
postanaesthetic, *adj.* बधिरणोत्तर–
posterior, *adj.* पश्च–
postmortem = necropsy
*post partum*, प्रसूतिपश्चात, प्रसवोत्तर
postprandial state, भोजनोत्तर अवस्था
post-synaptic membrane, संपर्क स्थानोत्तर पटल
postural hypotension, ऊर्ध्वस्थितिज अल्पदाब
posture, *n.* स्थिति (स्त्री.)
potable water, पिण्याचे पाणी, पेय जल
potency, *n.* क्षमता (स्त्री.)
potency assay, क्षमता आमापन
potency ratio, क्षमता गुणोत्तर
potential, *n.* विभव (न.)
potential mediator, विभव मध्यस्थ
potentiation, *n.* क्षमतावृद्धि (स्त्री.)
potentiometric titration, विभवमापी अनुमापन, विद्युतमितीय अनुमापन
potentiometry, *n.* विभवमिति (स्त्री.)
poultice, *n.* पोटीस (न.) *cf.* ointment
pour moulding, साचाओतन (न.), साच्यात ओतणे
pour plate, ओतपट्टी (स्त्री.)
powder insufflator = blower insufflator
powder mixer, चूर्ण मिश्रणी
preanaesthetic, *adj.* बधिरणपूर्व–
preanaesthetic medication, बधिरणपूर्व औषधोपचार
precession, *n.* पुरःसरण (न.)
precipitation of proteins, प्रथिन अवक्षेपण
precocious puberty, पूर्णपरिगत तारुण्यागम
precordially, *adv.* अभिहृदक्षेत्री
precursor, *n.* पूर्ववर्ती (पु.)
prediabetes, *adj.* मधुमेहपूर्व–
predilution, *adj.* विरलनपूर्व–
pre-eclampsia, *n.* गर्भजन्य आकडीची पूर्वावस्था (स्त्री.)
preerythrocytic, *adj.* लोहितपेशीपूर्व–
preferential, *adj.* अधिमान्य, अधिमत
prefilter, *n.* पूर्वगाळणी (स्त्री.)
preformulation, *adj.* सूत्रीकरणपूर्व–
preformulation phase, सूत्रीकरणपूर्व अवस्था (निर्मितिपूर्व अवस्थांच्या संदर्भात)
prejunctional site, संधिपूर्व स्थान
preload, *n.* पूर्वभार (पु.)
premature, *adj.* मुदतपूर्व–, अकालिक
premature labour, मुदतपूर्व प्रसूति
premenstrual tension, आर्तवपूर्व ताण
prepackaging, *n.* पूर्व वेष्टन (न.)
prepacking, *adj.* आवेष्टनपूर्व–
*preparation, *n.* १ (as, isolated) विरचना (स्त्री.) २ (as, of a drug) सिद्धि (स्त्री.) ३ (*also* finished preparation) सिद्ध पदार्थ (पु.) ४ मात्रारूप (न.)

**preparation and administration**, औषधसिद्धी व प्रदान

**preparation and dosage**, सिद्धी व मात्रा-पद्धती

**preparation and route of administration**, औषधसिद्धी व प्रदानमार्ग

**prepared opium**, सिद्ध अफू

**presbyopia**, *n.* दृष्टिक्षीणता (स्त्री.)

**prescription**, *n.* निर्देशपत्र (न.)

*cf.* inscription, पत्रांग
signatura, निर्देशांग
subscription, उपपत्रांग
superscription, अधिपत्रांग

**prescription balance**, निर्देशपत्र संतुलन

**prescription compounding**, निर्देशपत्रानुसारी संमिश्रण

*__prescription drug__, निर्देशपत्र अनिवार्य औषध

**prescription order**, निर्देशपत्र (न.)

**preservative**, *n.* रक्षक द्रव्य (न.), टिकवण (न.)

**press**, *n.* दाबसाचा (पु.)

**press cage**, दाब पिंजरा

**press-on closure**, दाब झाकण

**pressor effect**, दाबजनक परिणाम, दाबी परिणाम

**prevention**, *n.* प्रतिबंध (पु.)

**Prevention of Cruelty to Animals Act, 1960**, प्राण्यांना क्रूरतेने वागवण्यास प्रतिबंध अधिनियम, १९६०

**prevention of incompatibility**, असंयोज्यता प्रतिबंध

**preventive inoculation**, प्रतिबंधक लसटोचणी

**pricing scheme**, किंमत निर्धारण योजना

**primigravida**, *n.* प्रथमगर्भा (स्त्री.)

**primipara**, *n.* प्रथमप्रसवा (स्त्री.)

**probe**, *n.* शोधनी (स्त्री.)
*v.t.* शोधणे

**probit**, *n.* प्रसामान्यक (न.)

**process**, *n.* प्रक्रिया (स्त्री.)

**proctitis**, *n.* मलाशयशोथ (पु.), गुदशोथ (पु.)

**prodromal period**, पूर्वरूप काल

**prodrug**, *n.* अग्रऔषध (न.)

**production information sheet**, औषध माहिती पत्र

**production management**, उत्पादन व्यवस्थापन

**production procedure**, उत्पादन कार्यपद्धति

**productive cough**, कफोत्पादक खोकला

**product liability**, उत्पादन दायित्व

**product uniformity**, उत्पादन एकरूपता

**professional oath**, व्यावसायिक शपथ

**progestin**, *n.* प्रोजेस्टिन (न.)

**progestogen**, *n.* प्रोजेस्टोजेन (न.)

**prognosis**, *n.* फलानुमान (न.), साध्यासाध्यता विचार (पु.)

**progressive decline**, क्रमशः ऱ्हास

**prohibited advertisement**, प्रतिषिद्ध जाहिरात

**prohormone**, *n.* संप्रेरकपूर्वक (पु.)

**proinsulin**, *n.* प्राग्इन्सुलिन (न.)

**prokaryotic**, *adj.* असीम केंद्रकी

**prolactin**, *n.* प्रोलॅक्टिन (न.)

**proliferative**, *adj.* १ प्रवर्धी २ प्रचुरोद्भवी

**proliferative phase**, प्रवर्धी प्रावस्था

**prolonged**, *adj.* दीर्घकालीन, वाढलेला

**prolonged action**, (*also* called extended action) दीर्घित क्रिया

**prolonged action dosage form**, सतत कार्य मात्रारूप

**prominent**, *adj.* ठळक

**promoted gastric emptying**, प्रचालित जठर रिक्तन

**promoter**, *n.* प्रवर्तक (न.)

**promotional display**, संवर्धनार्थ देखावा

**prone**, *adj.* पालथा, अधोमुखस्थिति–

**proof spirit**, प्रमाणित स्पिरिट (as, in hundred proof spirit 50% प्रमाणित स्पिरिट)

**propellant**, *n.* प्रणोदक (पु.)
*adj.* प्रणोदक-

**propeller**, *n.* १ प्रणोदक (पु.) २ प्रणोदन पंखा (पु.)

**property**, *n.* गुणधर्म (पु.)

**prophase**, *n.* पूर्वावस्था (स्त्री.)

**prophylactic**, *adj.* प्रतिबंधक

**proprietary medicines**, (*also* proprietaries *or* pro-preparations) आयत्त औषधे (न.अ.व.) (आयत्त सिद्ध पदार्थ)
*cf.* nonproprietary medicines, निरायत्त औषधे

**proprietary names**, १ व्यावसायिक नावे (न.अ.व.) २ आयत्त नावे (न.अ.व.)

**prostatic carcinoma**, पुरःस्थ कर्कअर्बुद

**prosthetic group**, उपांग गट, प्रोस्थेटिक समूह

**prostration**, *n.* परिक्लांति (स्त्री.), शयानता (स्त्री.).

**protective**, *adj.* संरक्षी, संरक्षक

***protective colloid**, संरक्षी कलिल

**protective sheeting**, संरक्षी पट

**proteinaceous**, *adj.* प्रथिनतुल्य

**protein binding**, प्रोटीन बंधन

**protein bound**, प्रथिनबद्ध

**protein hydrolysate**, प्रोटीन हायड्रोलिसेट

**protein hydrolysate injection**, प्रोटीन हायड्रोलिसेट इंजेक्शन

**protein metabolism**, प्रथिन चयापचय

**protein synthesis**, प्रथिन संश्लेषण

**proteolytic enzyme**, प्रथिनलयी विकर

**prothrombin**, *n.* प्रोथ्रॉबिन (न.)

**protogenic**, *adj.* आद्यजात, प्रोटॉनजनक

**protolysis**, *n.* प्रोटॉन अपघटन (न.)

**protophilic**, *adj.* प्रोटॉनग्राही

**protoplasmic poison**, प्रजीवद्रव्य विष

**protozoa**, *n.* प्रोटोझोआ (पु.)

**provitamins**, *n. pl.* प्राग्जीवनसत्त्वे (न.अ.व.)

**proximal**, *adj.* समीपस्थ

**proximal myopathy**, समीपस्थ स्नायुविकृति

**pruritus**, *n.* कंड (स्त्री.), खाज (स्त्री.)

**pseudo-**, (in comb.) मिथ्या, आभासी

**pseudo first-order reactions**, आभासी प्रथम कोटि प्रक्रिया (स्त्री.अ.व.)

**pseudomembranous colitis**, (*also* pseudomembranous enterocolitis) आभासी पटल लघुबृहदांत्रशोथ

**pseudoplastic flow**, आकार्यता आभासी प्रवाह

**pseudoplasticity**, *n.* आभासी आकार्यता (स्त्री.)

**pseudopolymorphism**, *n.* आभासी बहुरूपता (स्त्री.)

**pseudotolerance**, *n.* मिथ्या सह्यता (स्त्री.)

**psittacosis**, *n.* (*also* ornithosis) शुकजन्य रोग (पु.), पक्षीजन्य रोग (पु.)

**psoriasis**, *n.* रजतशल्ककंड रोग (पु.)

**psychedelic drug**, भ्रमकारी औषध

**psychological and physical dependance**, मानसिक व शारीरिक अवलंबिता

***psychological dependance**, मानसिक अवलंबिता

**psychomotor disorder**, मनोकारक विकार

**psychomotor electric shock**, मनोकारक विद्युत आघात

**psychomotor incoordination**, मनोकारक असमन्वयन

**psychopharmacology**, *n.* मनोऔषधशास्त्र (न.)

***psychorheology**, *n.* मनःस्रोतशास्त्र (न.)

**psychosis**, *n.* मनोदुर्दशा (स्त्री.)

**psychotherapy**, *n.* मानसोपचार (पु.)

**psychotogenic**, *adj.* मनोदुर्दशाजनक

**psychotomimetic**, *adj.* मनोदुर्दशा-अनुकारी

**psychotropic**, *adj.* मनोवर्ती

**psychrometry**, *n.* शुष्कार्द्र-आर्द्रतामिति (स्त्री.)

**ptosis**, *n.* नेत्रच्छदपात (पु.)

**public liaison**, जनसंपर्क (पु.)

**puerperal,** *adj.* प्रासूतिक, अनुप्रसव–

**pulmonary,** *adj.* फुप्फुस–

**pulmonary edema,** फुप्फुस शोथ

**pulmonary embolism,** फुप्फुस अंतर्गुलिता

**pulmonary fibrosis,** फुप्फुस तंतूभवन

**pulp capping,** दंतमज्जा पिधान

**pulsatile,** *adj.* स्पंदनी

**pulse height analyser,** (*also* called pulse height discriminator) स्पंद आयाम विश्लेषक

**pulse height discriminator,** (*also* called pulse height analyser) स्पंद आयाम विवेचक

**pulverisation by intervention,** द्रवाधारित चूर्णन

**pulveriser,** *n.* चूर्णित्र (न.)

**pumping syndrome,** *Surgery* द्रुतरिक्तन संलक्षण

**punch,** *n.* दाबणी (स्त्री.), छिद्रक (पु.)

**punch filling,** दाबणी भरण

**punch force,** दाबणी बल

**punch press,** (*also* called tablet press) दाबणी साचा

**pupillary,** *adj.* बाहुली–, तारिका–

**purgation,** *n.* विरेचन (न.)

***purgative,** *n.* अतिसारक (न.)

**purification,** *n.* शुद्धीकरण (न.)

**purified water,** शुद्ध जल, शुद्ध पाणी

**purpura,** *n.* नीलारुण लक्ष्म (न.), परप्युरा (पु.)

*p. vivax,* (*short for plasmodium vivax*) पी वायवॅक्स

**pycnometer,** *n.* घनतामापी (पु.)

**pyelography,** *n.* वृक्कद्रोणिकाचित्रण (न.)

**pyelonephritis,** *n.* द्रोणिकावृक्कशोथ (पु.)

**pyloric stenosis,** जठरनिर्गम संकोच

**pyoderma,** *n.* सपूय त्वचारोग (पु.), पूयुक्त त्वचारोग (पु.)

**pyrexia,** *n.* ज्वर (पु.), ताप (पु.)

**pyrogen,** *n.* ज्वरजन (पु.), तापजन (पु.)

**pyrogenic,** *adj.* ज्वरजनक, तापजनक

# Q

**quadratic equation,** द्विघाती समीकरण

**qualitative,** *adj.* गुणात्मक

**qualitative microscopy,** गुणात्मक सूक्ष्मदर्शिकी

**quality assurance,** गुणवत्ता हमी

**quality control,** गुण नियंत्रण

**quality guidelines,** गुणवत्ता मार्गदर्शक तत्त्वे (न.अ.व.)

***quantal response,** द्विविकल्पी प्रतिसाद

**quantification,** *n.* अर्थमर्यादा दर्शन (न.)

**quantitative,** *adj.* परिमाणात्मक, संख्यात्मक

**quantitative microscopy,** परिमाणात्मक सूक्ष्मदर्शिकी

**quantum,** *n.* प्रमात्रा (स्त्री.)

**quarantinable disease,** दूरस्थापनावश्य रोग

**quarantine storage area,** दूरस्थापन साठा कक्ष

**quick-breaking foam,** जलद विरणारा फेस

# R

racemate, *n.* रासिमेट (न.)
racemisation, *n.* बहि:पूरण (न.)
*racial tolerance, वांशिक सह्यता
radiant energy, प्रारण ऊर्जा
radiant heat method, प्रारण ऊष्मा पद्धति
radiation, *n.* प्रारण (न.), किरणोत्सार (पु.)
radiation camera, प्रारण रूपित्र
radiation detection instrument, किरणोत्सार तपास उपकरण
radiation hazards, प्रारणातील धोके (पु.अ.व.)
radiation protection, किरणोत्सार संरक्षण
*radical curatives, समूळ संसाधके (न.अ.व.)
radioactive, *adj.* किरणोत्सारी
radioactive decay, किरणोत्सारी ऱ्हास
radioactive isotope, किरणोत्सारी समप्रोटॉन, किरणोत्सारी समस्थानिक
radioactive label, किरणोत्सारी खूण, किरणोत्सारी अंकन
radioactivity, *n.* किरणोत्सारिता (स्त्री.)
radioautograph, *n.* (*also* autoradiograph) किरणोत्सार चित्र (न.)
radiochemical, *adj.* किरणोत्सारी रसायन, रेडिओ रसायन
radiochemical assay, किरणोत्सारी रसायन आमापन
radiochemical purity, किरणोत्सारी पदार्थाची रासायनिक शुद्धता
radiography, *n.* क्ष-किरण चित्रण (न.), प्रारणचित्रण (न.)
radioimmune, *adj.* किरणोत्सार–प्रतिक्षम–
radioimmunoassay, *n.* (*abbr.* RIA), प्रतिक्षमताशास्त्रीय किरणोत्सारी आमापन (न.)
radioisotope, *n.* किरणोत्सारी समस्थानिक (न.)
radioisotope calibrator, प्रारण समस्थानिक अंशित्र
radioisotope syringe, किरणोत्सारी समस्थानिक पिचकारी
radioisotopic cow, किरणोत्सार समस्थान
radio labelled insulin, किरणोत्सारांकित इन्सुलिन
radiological safety, किरणोत्सारापासून सुरक्षितता
radiolysis, *n.* प्रारणी अपघटन (न.)
radiometric analysis, प्रारणमितीय विश्लेषण
radio–nuclide, *n.* किरणोत्सार केंद्रकाभ (न.)
radionuclidic assay, किरणोत्सारी न्यूक्लाइडिक निकषमूल्यन
radiopaque, *adj.* प्रारण-अपार्य
radiopharmaceutical, *n.* किरणोत्सारी औषधिद्रव्य (न.)
radiopharmaceutical control, किरणोत्सारी औषधिद्रव्य नियंत्रण
radiosterilisation, *n.* किरणोत्सारी निर्जंतुकन (न.)
radiotherapy, *n.* किरणोपचार (पु.)
radium applicator, रेडिअम योजित्र
raffinate, *n.* परिष्कार्य (न.), रॅफिनेट (न.)
rancidity, *n.* खवटपणा (पु.)
random, *adj.* स्वैर, यादृच्छिक
randomisation technique, यादृच्छीकरण तंत्र
random variation, यादृच्छिक विचरण
range of doses, मात्रांची मर्यादा
rapid acetylater, शीघ्र अॅसॅटिलीकारक
rapid inactivator, शीघ्र निष्क्रियक
rapidly progressive, (crescentic) द्रुतवर्धी
rare–earth elements, दुर्लभ मृदा मूलद्रव्ये (न.अ.व.)
rare earths, दुर्लभ मृदा
rate constant, वेग स्थिरांक
*rate–determining step, (*also* key step) गतिनिर्णायक टप्पा
rate-limited dissolution, वेगमर्यादित प्रविलयन

**rate limiting step,** गतिसीमक टप्पा
**rate-meter,** *n.* वेग मापी (पु.)
**rate of secretion,** स्त्राव गति, स्त्राव वेग
***rate of shear,** (*also* called velocity gradient) कर्तन वेग
**rate process,** वेग प्रक्रिया
**rat holing,** मूषक विवरीकरण
**rational basis,** तर्कसंगत आधार
**rational indication,** तर्कसंगत उपयोगिता
**rational therapeutics,** तर्कसंगत उपचारशास्त्र
**r–determinants,** *n. pl.* आर-निर्धारक (पु.अ.व.)
**reabsorption,** *n.* पुनःशोषण (न.)
**reaction,** *n.* १ प्रतिक्रिया (स्त्री.) २ अभिक्रिया (स्त्री.)
**reaction order,** अभिक्रिया क्रम, अभिक्रिया कोटि
**reaction time,** प्रतिक्रिया अवधि
**reaction velocity constant,** अभिक्रिया वेग-स्थिरांक
**reactivity,** *n.* १ प्रतिक्रियाशीलता (स्त्री.) २ अभिक्रियाशीलता (स्त्री.)
**reactor,** *n.* १ (as, vessel) क्रियाधानी (स्त्री.) २ (atomic reactor) अणुभट्टी (स्त्री.)
**rebound hypercoagulability,** उत्प्लवी अति-साकळणक्षमता
**rebound hypoglycaemia,** उत्प्लवी अल्पग्लुकोज रक्तता
**rebound thromboembolism,** उत्प्लवी घनास्त्र अंतर्गुलिता
**recall,** *v.t.* परत बोलावणे
**recall of drug product,** औषध उत्पादन मागे घेणे
**recently prepared,** सद्यःकालीन *cf.* freshly prepared
***receptor,** *n.* ग्राही (पु.)
**receptor–occupancy theory,** ग्राही व्यापृतता उपपत्ति
**receptor site,** ग्राही स्थान
**receptor-type activity,** ग्राहीसदृश क्रिया
**recipe,** *n.* कृति (स्त्री.)
**reciprocating die process,** व्युत्क्रमी साचा प्रक्रिया
**reclaiming,** *n.* पुनःप्रापण (न.)
**recombination,** *n.* पुनःसंयोजन (न.)
**record,** *v.t. & i.* १ अभिलेख ठेवणे २ नोंद करणे
**recording lever,** नोंद तरफ
**recovery,** *n.* पूर्वावस्थालाभ (पु.)
**recovery time,** पूर्ववत्‌भवन काल
**recrudescence,** *n.* पुनरावृत्ति (स्त्री.)
**recrystallisation,** *n.* पुनःस्फटन (न.)
**rectal suppositories,** मलाशय वर्तिका (स्त्री.अ.व.)
**rectal syringe,** मलाशय पिचकारी
**recurrent acute infection,** पुनरावृत्त तीव्र संक्रमण
**recurrent aphthous stomatitis,** पुनरावर्ती ॲफ्थस मुखशोथ
**redispersibility,** *n.* पुनः अपस्करणता (स्त्री.)
**redox,** *adj.* क्षपणॉक्सी
**red thrombus,** लाल घनास्त्र
**reducing valve,** क्षपण झडप
**reductase inhibitor,** रिडक्टेज संदमी
**reduction,** *n.* १ *Chem.* क्षपण (न.) २ घट (स्त्री.) (औषधनिर्मितीच्या संदर्भात)
**reduction of contamination,** संदूषण घट
**re-entrant arrhythmia,** पुनःप्रवेशी अतालता
**re-excretion,** *n.* पुनरुत्सर्जन (न.)
**reference electrode,** संदर्भ इलेक्ट्रोड
**reference standard,** संदर्भ मानक
**reference state,** संदर्भ अवस्था
**refill,** *v.t.* पुनर्भरण करणे
**refilling of prescription,** निर्देशपत्र पुन्हा भरणे
**reflection of light by colloid particles,** कलिल कणांद्वारे प्रकाशाचे परावर्तन

**reflectivity,** *n.* परावर्तकता (स्त्री.)
**reflex effect,** प्रतिक्षिप्त परिणाम
**reflux,** *n.* पश्चवाह (पु.)
**refractive index,** अपवर्तनी निर्देशांक, वक्रीभवनांक (पु.), अपवर्तनांक (पु.)
**refractometer,** *n.* अपवर्तनांकमापी (पु.)
**refractometry,** *n.* अपवर्तनांकमापन (न.)
***refractory period,** विलंबकारी अवधि
**refresh,** *v.t. & i.* उल्हसित करणे, उल्हसित होणे
**refreshing,** *adj.* उल्हासकारी
**refrigerant effect,** प्रशीतकर परिणाम
**refrigeration,** *n.* प्रशीतन (न.)
**refrigeration facilities,** प्रशीतन सुविधा (स्त्री.अ.व.)
**regimen design,** विधान संकल्पन
**regional enteritis** = **Crohn's disease**
**regression analysis,** १ समाश्रयण विश्लेषण २ प्रतीपगामी विश्लेषण
**regulation of secretion,** स्राव नियमन
**Regulations of Pharmacy Council,** फार्मसी कौन्सिलचे विनियम (पु.अ.व.)
**regulator,** *n.* नियामक (पु.)
**regulatory requirements,** नियामक आवश्यक अटी (स्त्री.अ.व.)
**rehabilitation programme,** पुनर्वसन कार्यक्रम
**rehydration,** *n.* पुनस्सजलन (न.), पुनस्सजलीकरण (न.), पुनस्सजलीभवन (न.)
**reinforcement of conditioning,** सनियमन प्रबलन
**rejection mechanism,** नकारी यंत्रणा
**relapsing fever,** पुनरावर्ती ताप, उलटलेला ताप
***relative contraindication,** निरपवाद निषिद्धता
**relative density,** सापेक्ष घनता
**relative potency,** सापेक्ष क्षमता
**relaxant,** *adj.* शिथिलकारी
*n.* शिथिलकारी (पु.)
**relay station,** पुनःक्षेपण केंद्र
**release-inhibiting hormone,** विमोचन संदमी संप्रेरक
**releasing factor,** विमोचक घटक
**relief,** *n.* परिहार (पु.)
**remedy,** *n.* उपाय (पु.)
**remote device,** अंतरित साधन
**remote pipetting device,** अंतरित चूषणाचे साधन
**removers,** *n.pl.* काढून टाकणारे (न.अ.व.)
**renal calculi,** वृक्क अश्मरी
**renal clearance,** वृक्कज निचरा
**renal disease,** वृक्क रोग
**renal osteodystrophy,** वृक्कीय अस्थिदुष्पोषण
**renal shut down,** वृक्क कार्यरोध (पु.)
**renovascular hypertension,** वृक्कवाहिनीजन्य अतिरक्तदाब
**repacking licence,** पुनर्भरण अनुज्ञप्ति
***repeat action,** पुनरावृत्त क्रिया
**repeat action drug product,** पुनरावृत्त क्रिया औषध उत्पादन
**repetab,** *n.* बहुमात्रा विमोचनी गोळी (स्त्री.), बहुमात्रा विमोचनिका (स्त्री.)
**repetitive dosing,** पुनः पुनः मात्रा देणे
**replacement,** *n.* प्रतिस्थापन (न.)
**repolarisation,** *n.* पुनर्ध्रुवण (न.)
**reporting procedure,** प्रतिवेदन पद्धति
***repository,** *n.* निधानी (स्त्री.)
**repository injection,** निधानी अंतःक्षेपण
**reproducibility,** *n.* पुनरुत्पादनक्षमता (स्त्री.)
**repulsive potential,** प्रतिकर्षी विभव
**requisition form,** मागणीपत्राचा नमुना
**research drugs** = **investigational drugs**
**resin,** *n.* राळ (स्त्री.), रेझिन (स्त्री.)
**resistance,** *n.* (microbial) प्रतिरोध (पु.) (सूक्ष्मजीवांचा)

**resistant**, *adj.* प्रतिरोधी
**resonance**, *n.* संस्पंदन (न.)
**resonance effect**, संस्पंदन परिणाम
**resonance spectrometry**, संस्पंदन पंक्तिमिति
**respirator**, *n.* श्वसनित्र (न.)
**respiratory acidosis**, श्वसनी आम्लवृद्धि
**respiratory alkalosis**, श्वसनी अल्कवृद्धि
**respiratory depressant action**, श्वसन अवसाद क्रिया
**respiratory insufficiency**, श्वसनी न्यूनता
**respiratory paralysis**, श्वसन पक्षाघात
**response**, *n.* प्रतिसाद (पु.)
**resting phase**, विश्राम प्रावस्था
**restlessness**, *n.* अस्वस्थता (स्त्री.)
**resuscitation cart**, पुनश्चेतन गाडी
**retail sale of drugs**, औषधांची किरकोळ विक्री
**retardant**, *adj.* मंदनकारक, मंदनकारी
**retardation**, *n.* मंदन (न.)
**retarded gastric emptying**, मंदित जठर रिक्तन
**retching**, *n.* कोरडी वांती (स्त्री.)
**retention enema**, धारक बस्ति
**reticular**, *adj.* जालीय
**retinopathy**, *n.* दृक्पटल विकार (पु.)
**retrolental**, *adj.* भिंगपश्च–
**return goods**, प्रत्यागत माल, परत आलेला माल
***re–uptake**, *n.* पुनर्ग्रहण (न.)
**reversal of intoxication**, विषावसान प्रत्यावर्तन
**reversed-phase chromatography**, व्युत्क्रमित प्रावस्था वर्णलेखन
**reversible**, *adj.* परिवर्तनी, व्युत्क्रमी
**reversible antagonism**, प्रत्यावर्ती विरोधिता
**revision of the formulation prices**, मात्रारूपांच्या किमतींचे पुनरीक्षण
**Reynold's number**, रेनॉल्ड अंक
**rheogram**, *n.* स्रोत रोधलेख (पु.)
**rheological change**, स्रोतशास्त्रीय परिवर्तन
***rheology**, *n.* स्रोतशास्त्र (न.)
**rheology of dispersion**, अपस्करण स्रोतशास्त्र
**rheumatic carditis**, संधिवाती हृद्शोथ
**rheumatic fever**, संधिज्वर (पु.)
**rheumatism**, *n.* संधिवात (पु.), आमवात (पु.)
**rheumatoid**, *adj.* संधिवाताभ
**rheumatoid arthritis**, संधिवाताभ संधिशोथ
**rhinitis**, *n.* नासिकास्तरशोथ (पु.)
**rhinorrhoea**, *n.* नासाप्रवाह (पु.), नासाधारा (स्त्री.)
**rhinovaccination**, *n.* नाकावाटे लस देणे (न.)
**rhizome**, *n.* मूलस्तंभ (पु.)
**RIA**, (*short for* radioimmunoassay) आर-आयए (प्रक्रिया)
**ribbed funnel**, पन्हळीदार नरसाळे
**ribbon blender**, फीत अभिमिश्रणी
**rickettsia**, *n.* (a group of spherical or rodlike parasitic organisms) रिकेटझिया (पु.)
***righting reflex**, सम्यकी प्रतिक्षेप
**rod**, *n.* १ दंड (पु.), कांडी (स्त्री.) २ दांडा (पु.), सळी (स्त्री.)
**rodent**, *n.* कृंतक (पु.)
**rodenticidal**, *adj.* कृंतकनाशी
**rodenticide**, *n.* कृंतकनाशी (न.), कृंतकनाशक (न.)
**roentgenography**, *n.* क्ष-किरण चित्रण (न.)
**roller mill**, रूळ दळणयंत्र
**roll-on closure**, लोटण निमीलन, घरंगळी झाकण, परिवर्तन संवृत्ति
**rose water ointment**, गुलाबपाणी मलम
**rotameter**, *n.* रोटामीटर (पु.)
**rota rod** = **rotating rod**
**rotary**, *adj.* घूर्णनी, घूर्णी
**rotary capsule machine**, घूर्णनी संपुटिका यंत्र
**rotary die process**, घूर्णनी साचा प्रक्रिया
**rotary drum vacuum filter**, घूर्णनी ड्रम निर्वात गाळणी

rotary granulator, घूर्णी कणित्र
rotary knife cutter, घूर्णी पाते छेदक
rotary tablet machine, घूर्णी वटिकायंत्र
rotary tablet presser, घूर्णी वटिकादाबयंत्र, घूर्णी वटिकादाबक
*rotating rod, (*also* rota rod) घूर्णी दंड
rotating wiremesh basket, घूर्णी तारजाल-नलिका (बास्केट)
rotational dissolution, घूर्णी प्रविलयन
rotational isomerism, घूर्णनी समघटकता
rotoclone, *n.* रोटोक्लोन (पु.)
rotor-stator, *n.* घूर्णक स्थिरक (पु.)
-rrhea, (in comb.) -प्रवाह (पु.), -धारा (स्त्री.)
rubber bung, रबरी बूच
rubbing alcohol, चोळावयाचे अल्कोहोल
rubefacient, *adj.* रक्तिमाकारी

# S

saccharimetry, *n.* शर्करामिति (स्त्री.)
saccharolytic flora, शर्करालयी वनस्पति जात
saddle area, पल्याणस्पर्शी भाग
safety stock, सुरक्षा साठा
Sales Promotion Employees (condition of service) Act, 1976, विक्रय संवर्धन कर्मचारी (सेवाशर्ती) अधिनियम, १९७६
salicylate, *n.* सॅलिसिलेट (न.)
saline, *adj.* १ लवणद्राव– २ क्षार–
saline purgative, लवण विरेचक
salivary, *adj.* लाला–
salivary excretion, लाला उत्सर्जन
salivation, *n.* लालास्राव (पु.)
salmonella infection, साल्मोनेला संक्रमण
salpingitis, *n.* डिंबवाहिनीशोथ (पु.)
salt, *n.* १ लवण (न.) २ क्षार (पु.)
salt bridge, क्षार सेतु
salting in, क्षारीय द्रावणीयता वृद्धि
salting out, क्षारीय अवक्षेपण
salt polishing, क्षार चकाकीकरण
sample size, नमुना संख्या
sampling, *n.* १ नमुना घेणे (न.), नमुना निवड (स्त्री.) २ नमुनाचाचणी (स्त्री.)
sandwich compounds, सॅन्डविच संयुगे (न.अ.व.)
sanitary napkin, आरोग्यरक्षक नॅपकिन
sanitizer, *adj.* स्वच्छकारी
saponification number, साबणीकरणांक (पु.)
saponification value, साबणीकरण मूल्य
satellite pharmacy, उप औषधनिर्माणशाळा
satiety, *n.* तृप्ति (स्त्री.)
saturation, *n.* संतृप्ति (स्त्री.), संपृक्ति (स्त्री.)
saturation analysis, संतृप्ति विश्लेषण
saturation humidity, संतृप्ति आर्द्रता
scale of scrutiny, परिनिरीक्षण मापन
scale up technique, प्रमाणवृद्धि तंत्र
scalpel, *n.* स्काल्पेल (स्त्री.), विच्छेदनी (स्त्री.)
scanning, *n.* क्रमवीक्षण (न.)
schizogony, *n.* विखंडनजनन (न.)
schizont, *n.* खंडप्रसू (पु.)
schizonticidal, *adj.* खंडप्रसूमारक
schizophrenic, *adj.* छिन्नमनस्क
scintillation camera, प्रस्फुरण कपित्र
*sclerosing agent, दृढकारक (न.)

**sclerosis**, *n.* ऊतिकाठिण्य (न.), ऊतिदृढन (न.)

**scotoma**, *n.* काळे ठिपके (पु.अ.व.) (दृष्टि-क्षेत्रातील)

**colour scotoma**, रंगीत ठिपके (दृष्टि-क्षेत्रातील)

**screw cap**, मळसूत्री झोपण

**scurvy**, *n.* स्कर्वी (पु.), ॲस्कॉर्बिक आम्ल-हीनता (स्त्री.)

**seal**, *n.* सील (न.), मुद्रा (स्त्री.), मोहोर (स्त्री.)

**seal coat**, जलरोधी वेष्टन

**sealing**, *n.* बंद करणे (न.), मुद्रा लावणे (न.)

**sealing fault**, सीलन दोष

**seal testing**, सील चाचणी

**seamless**, *adj.* जोडरहित

**seborrhea**, *n.* त्वग्वसास्राव (पु.), त्वग्वसा-धारा (स्त्री.)

**seborrheic**, *adj.* त्वग्वसास्रावी

**seborrheic dermatitis**, त्वग्वसास्रावी त्वचा शोथ

**sebum**, *n.* त्वग्वसा (स्त्री.)

**secondary infection**, दुय्यम संसर्ग

**secondary sex character**, दुय्यम लिंग लक्षण

**second messenger**, द्वितीय संदेशवाही

**second order**, द्वितीय क्रम, द्वितीय कोटि

**secretion**, *n.* स्राव (पु.)

**secular**, *adj.* अतिदीर्घकालिक

**securely closed** = tight closed

**sedative**, *n.* शामक (न.)

**sedimentation**, *n.* अवसादन (न.)

***sedimentation potential**, अवसादन विभव

**segment of ileum**, शेषांत्र खंड

**segregation**, *n.* विलगन (न.)

**selective**, *adj.* निवडक

**self-bodying emulsifying action**, स्व-कायन पायसकारी क्रिया

**self emulsifying wax**, स्वयं पायसकारक मेण

**self-medication**, *n.* स्वयं औषधोपचार (पु.)

**self-medication programme**, स्वयं औषधो-पचार आयोजना

**self-sealability**, *n.* स्वयं सीलनक्षमता (स्त्री.), स्वमोहोरता (स्त्री.)

**self-sterilising fluid**, स्वयं निर्जंतुकीकरण द्रायु

**semi-conductor detector**, अर्धवाहक संसूचक

**seminiferous tubule**, शुक्रजनक सूक्ष्मनलिका

**semipermeable**, *adj.* अर्धपार्य

**semipermeable membrane**, अर्धपार्य पटल

**semipolar**, *adj.* अर्धध्रुवी

**semi-solid**, *adj.* अर्ध-घन

**semisynthetic**, *adj.* अंश संश्लेषित

**senile dementia**, जराजन्य मनोन्हास, वार्ध-क्यातील मनोन्हास

**senna**, *n.* सोनामुखी (स्त्री.)

**sensation**, *n.* संवेदन (न.), संवेदना (स्त्री.)

**sense of proportion**, प्रमाणशीलतेचे भान

**sensitisation**, *n.* संवेदीकरण (न.), संवेदीभवन (न.)

**sensitive**, *adj.* संवेदी

***sensitivity**, *n.* सूक्ष्मग्राहिता (स्त्री.), संवेदिता (स्त्री.)

**separability factor**, विलगनशीलता घटक

**septicaemia**, *n.* पूतिरक्तता (स्त्री.), पूति-जीवाणुरक्तता (स्त्री.)

**sequela**, *n.* परिणामभूत रोग (पु.)

**sequentially exposed**, अनुक्रमाने प्रकाशित

**sequential reaction**, १ अनुक्रमित प्रतिक्रिया २ अनुक्रमित अभिक्रिया

**sequential regimen**, अनुक्रमित पद्धति

**sequestering**, *adj.* विविक्तकारी

**sequestering resin**, विविक्तकारी राळ

**sequestration**, *n.* विविक्तन (न.)

**serial dilution**, श्रेणीय विरलन

**serous cavity**, सीरमी गुहिका

**serum lipid**, रक्तलस सीरम, रक्तलस वसा

*serum sickness, रक्तलस [illegible]
setting point, जडण बिंदु
sex hormone, लिंग संप्रेरक
sexogen, *n.* सेक्सोजेन (पु.)
sexually transmitted disease, संयोग संक्रमी रोग
shaving foam, दाढी फेस
shearing force, कर्तरण बल
*shearing stress, कर्तरण प्रतिबल
shear rate level, कर्तर वेग पातळी
shear strain, कर्तरण विकृति
shear strength, कर्तरण सामर्थ्य
shear stress, कर्तर प्रतिबल
shear thickening, कर्तरण सांद्रीभवन
shear thickening system, कर्तरण सांद्रीभवन संस्था
shear thinning system, कर्तरण असांद्रीभवन संस्था
*shelf life, साठवण कालमर्यादा
shell, *n.* कवच (न.)
shellac, *n.* लाख (स्त्री.)
Shigella infection, शिगेला संक्रमण
shipping and receiving, १ माल चढवणे व उतरवणे २ माल पाठवणे व स्वीकारणे
shock, *n.* आघात (पु.), मर्माघात (पु.), धक्का (पु.)
shunt, *n.* उपमार्ग (पु.)
sialogogue, *n.* (*also* sialagogue) लालोत्पादक (न.)
sialorrhea, *n.* लालातिस्राव (पु.), लालाधारा (स्त्री.)
*sibling, *n.* सहोदर (पु.)
*side effect, आनुषंगिक परिणाम
sieve, *n.* चाळणी (स्त्री.)
sigma-blade mixer, सिग्मा-पाते मिश्रणी
sigma-bond complex, सिग्मा-बंध जटिल
sigma molecular bond, सिग्मा रेणु-बंध
sigma orbital, सिग्मा कक्षिका
sigmoid, *adj.* अवग्रहाभ
sigmoid curve, अवग्रहाभ वक्र, अवग्रहाभ आलेख
signatura, *n.* निर्देशांश (न.) *cf.* prescription
significant difference, लक्षणीय फरक, अर्थवत् फरक
silent gene, अव्यक्त जीन
silicosis, *n.* सिलिकाश्मयता (स्त्री.), सिकताश्मयता (स्त्री.)
simian, *adj.* वानरवत्
simple and compound preparations, एक व अनेक औषध सिद्धी
simple diffusion, सरल विसरण
*simple syrup, साधा पाक, साधे सिरप
single blind technique, एकल अनभिज्ञ तंत्र
single punch tablet press, एकेरी वटिका दाबयंत्र, एकेरी वटिका दाबक
single unit dose, एकक मात्रा
sino-auricular, *adj.* शिरानालअलिंद–
sinovial fluid, संधिअंतराल द्रव
sinovium, *n.* संधिअंतराल (न.)
sintered ceramics, तापपिंडित मृत्पात्रे (न.अ.व.), सिंटरित सिरॅमिके (न.अ.व.)
sintered glass filter, तापपिंडित काच गाळणी
sinusitis, *n.* सुषिरशोथ (पु.)
sinus rhythm, शिरानाल लय, शिरानाल आवर्तन
sitz bath = hip bath
sizing, *n.* आकारमानानुसार वर्गीकरण (न.)
skeletal muscle, कंकाल स्नायु
skeletal muscle relaxant, कंकाल स्नायु शिथिलकारी
skeletal neuromuscular transmission, कंकाल चेता स्नायु पारेषण
skewing, *n.* विचलन (न.)
skiagram, *n.* छायालेख (पु.) (क्ष-किरणचित्र)
skin disease, त्वचारोग (पु.)
skin rash, पुरळ (न.)

**sleeping aids,** निद्रा साह्यके (न.अ.व.)
**sliding scale,** सरकती मापनी
**slimming foods,** कृशकारी आहार
**slow acetylator,** मंद ॲसेटिलीकारक
**slow reacting substances,** (*abbr.* **SRS**) स्लो रिॲक्टिंग सबस्टंसेस
**slag,** *n. Tablet manufacture* लोष्टक (न.), स्लग (पु.), मोठी कठीण गोळी (स्त्री.)
**slugging,** *n.* लोष्टन (न.)
**sludge,** *n.* [illegible] (स्त्री.), कणयुक्त द्राव (पु.), गारा (पु.)
**smoke,** *n* धूर (पु.)
**smooth,** *v.t.* गुळगुळीत करणे, नितळ करणे
**smooth contraction,** सहज आकुंचन
**smoothing,** *n.* गुळगुळीत करणे (न.), नितळ करणे (न.)
**smooth muscle,** अरेखित स्नायु
***sodium chloride equivalent,** (tonicic equivalent; isotonic solutions) सोडिअम क्लोराइड सममूल्य
**sodium retention,** सोडिअम-धारण (न.)
**softening test,** मृदूकरण चाचणी
**soft gelatin,** मृदु जिलेटिन
**soft gelatin capsule,** मृदु जिलेटिन संपुटिका
***soft soap,** मृदु साबण
**sojourn,** *n.* अल्पवास (पु.)
***sol,** *n.* सॉल (पु.)
**solidification point,** घनीभवन बिंदु
**solid solution,** घन द्रावण
**solid stream,** घन स्रोत
**solid-stream aerosol,** घन स्रोत सूक्ष्मतुषार
**solubilisation,** *n.* विद्राव्यकरण (न.)
**solubilising agent,** विद्राव्य कारक
**solubility,** *n.* विद्राव्यता (स्त्री.), द्रावणीयता (स्त्री.), द्राव्यता (स्त्री.)
**solubility parameters,** द्रावणीयता प्राचले (न.अ.व.)
**solubility product,** द्रावणीयता गुणनफल
**soluble,** *adj.* विद्राव्य
**solution,** *n.* विद्रावण (न.), द्रावण (न.)
**solution rate theory,** विद्रावण गति सिद्धांत
***solution tablets,** (*also* solvellae) विद्राव्य वटिका (स्त्री.अ.व.)
**solvate,** *v.i.* विद्रावण होणे
**solvation,** *n.* विद्रावण (न.)
**solvellae** = solution tablets
**solvent,** *n.* द्रावक (पु.)
*adj.* द्रावक
**somnolence,** *n.* निद्रालुता (स्त्री.)
**sorption,** *n.* शोषण (न.)
**source,** *n.* उगमस्थान (न.)
**space allocation,** जागेचे नियत वाटप
**spansule** = pellet
**spare receptor,** शिल्लकी ग्राही
**spasm,** *n.* आकर्ष (पु.)
**spasmogen,** *n.* आकर्षजनक (पु.)
**spasticity,** *n.* ताठरता (स्त्री.), स्नायुतानता (स्त्री.)
**spatula,** *n.* स्पॅच्युला (पु.), चपटा चमचा (पु.)
**spatulation,** *n.* स्पॅच्युलाने मिसळणे (न.)
**specialised cells,** विशेषकार्य पेशी (स्त्री.अ.व.)
**species concentration,** जाति संकेंद्रण
***species tolerance,** जाति सह्यता
**specific,** *adj.* विशिष्ट
**specification,** *n.* विनिर्देश (पु.)
**specific heat,** विशिष्ट उष्मा
**specific ionisation,** विशिष्ट आयनन
***specificity,** *n.* विशिष्टता (स्त्री.)
**specific manifestation,** विशिष्ट आविष्कार
**specific rate constant,** विशिष्ट क्रियागति स्थिरांक
**specific surface,** विशिष्ट पृष्ठ
**spectra,** *n. pl.* (*sing.* spectrum) पंक्ती (स्त्री.अ.व.), स्पेक्ट्रा (पु.अ.व.)
**spectral absorption curve,** पंक्ति शोषण वक्र

**spectrofluorometer,** *n.* पंक्तिप्रतिदीप्तिमापी (पु.)

**spectrograph,** *n.* पंक्तिलेखी (पु.), स्पेक्ट्रोग्राफ (पु.)

**spectrometry,** *n.* पंक्तिमिति (स्त्री.)

**spectrophotometer,** *n.* पंक्तिअनुदीप्तिमापी (पु.)

**spectrophotometric absorbance measurement,** पंक्तिअनुदीप्तिमितीय शोषकता मापन

**spectrophotometry,** *n.* पंक्तिअनुदीप्तिमिति (स्त्री.)

**spectroscopy,** *n.* पंक्तिदर्शन (न.)

**spectrum,** *n.* (*pl.* spectra) पंक्ति (स्त्री.), स्पेक्ट्रम (पु.)

**spermatogenesis,** *n.* शुक्रपेशीजनन (न.)

**spheronisation process,** सूक्ष्म गुलिकाकरण

**spike,** *n.* आर (स्त्री.)

**spinal animal,** मेरुरज्जु नियंत्रित प्राणि

**spinal shock,** मेरुरज्जु आघात

**spinhaler,** *n.* फिरकी श्वासित्र (न.)

**spin quantum number,** आत्मभ्रमण क्वॉटम अंक

**spin-spin coupling,** आत्मभ्रमण-आत्मभ्रमण युग्मन

**spirit,** *n.* स्पिरिट (न.)

**spirochete,** *n.* कुंतलाणु (पु.), तरंगाणु (पु.), सर्पिलाणु (पु.)

**spirocheticidal,** *adj.* कुंतलाणुमारक

**splanchnic,** *adj.* १ आंतरांग– २ आंतरांगी

**splinter,** *n.* ढलपी (स्त्री.)
*v.i.* ढलपा निघणे, ढलपणे

**splintering,** *n.* बारीक तुकडे होणे (न.)

**spoilage,** *n.* खराबी (स्त्री.)

**spoilage by microbe,** सूक्ष्मजीवांमुळे झालेली खराबी

**sponge process,** स्पंज प्रक्रिया

**spontaneity,** *n.* उत्स्फूर्तता (स्त्री.)

**spontaneous contraction,** उत्स्फूर्त आकुंचन

**spontaneous metastasis,** उत्स्फूर्त विक्षेप

**spontaneous movement,** उत्स्फूर्त हालचाल

**spore staining,** बीजाणु अभिरंजन

**sporozoite,** *n.* बीजजीवक (पु.)

**spotting,** *n.* ठिपके उमटणे (न.)

**spray actuator,** तुषार प्रवर्तक

**spray congealing,** तुषार संघनन

**spray-congealing process,** तुषार संघनन प्रक्रिया

**spray dispensing aerosol,** औषध सूक्ष्म-तुषारित्र

**spray dryer,** तुषार शुष्कक

**spray drying,** तुषार शुष्कन

**spray-on protective film,** तुषार संरक्षी पटल

**spray system,** तुषार पद्धति, फवारा पद्धति

**spray testing,** तुषार चाचणी, फवारा चाचणी

**spreader,** *n.* प्रसारक (पु.)

**spreading coefficient,** प्रसारी गुणांक

**spread plate,** प्रसारी पट्टिका

**spring catarrh,** वसंत प्रतिश्याय

**sprue,** *n.* मेदसंग्रहणी (स्त्री.)

**spurious preparation,** नकली सिद्ध पदार्थ

**sputum,** *n.* कफ (पु.), बेडका (पु.)

**squeak threshold,** चित्कारण प्रभावसीमा

**SRS,** (*abbr.* of slow reacting substances) एसआरएस

**stabilisation,** *n.* स्थिरण (न.), स्थिरीकरण (न.), स्थिरीभवन (न.)

**stabiliser,** *n.* स्थिरक (पु.)

**stability,** *n.* स्थिरता (स्त्री.), स्थायित्व (न.), स्थैर्य (न.)

**stability testing,** स्थैर्य चाचणी

**stages of gestation,** सगर्भतेच्या अवस्था (स्त्री.अ.व.)

**stagnant,** *adj.* अवरुद्ध, कुंठित, अप्रवाही

**stalagmometer,** *n.* स्टॅलॅग्मोमीटर (न.) (एकप्रकारचे पृष्ठताणमापी)

**standard,** *n.* मानक (न.), प्रमाण (न.)
*adj.* प्रमाणित

**standard deviation,** प्रमाण विचलन

standard errors of mean, प्रमाण मध्य दोष (पु.अ.व.)
*standardisation, *n.* मानकन (न.), प्रमाणन (न.)
standardisation committee, मानकन समिति
standard oxidation reduction potential, प्रमाण ऑक्सिडन क्षपण विभव
standard state, प्रमाण अवस्था
starvation, *n.* उपाशी ठेवणे (न.), उपासमार (स्त्री.)
starve, *v.t.* उपाशी ठेवणे
state of anxiety, चिंतातुरता (स्त्री.)
state of hesitation, अनिश्चयावस्था (स्त्री.)
State Pharmacy Council, राज्य औषधनिर्माण परिषद
static charge, स्थितिक प्रभार
statistical quality control, सांख्यिकी गुणवत्ता नियंत्रण
status asthmaticus, सतत दमा
status epilepticus, सतत अपस्मारावस्था, सतत अपस्मार
steady level, स्थिर पातळी
steady state, स्थिर अवस्था, निश्चल अवस्था
steady-state plasma level, स्थिर अवस्था रक्तद्रव पातळी
steam boiler, बाष्पक (न.)
steam distillation, वाफ ऊर्ध्वपातन
steam packs, बाष्प आवेष्टने (न.अ.व.)
steam steriliser, बाष्प निर्जंतूकरण यंत्र
steam trap, बाष्प चाप
steatorrhea, *n.* मेदरेच (पु.), वसारेच (पु.)
stereochemistry, *n.* त्रिमितिरसायनशास्त्र (न.)
stereoisomerism, *n.* त्रिमिति समघटकता (स्त्री.)
stereo stabilisation, त्रिमिति स्थिरण
steric exclusion chromatography, त्रिमिति अपवर्जन वर्णलेखन
steric stabilisation, त्रिमिति स्थिरण
sterile gauze, निर्जंतुक गॉज
sterile products, निर्जंतुक उत्पादने (न.अ.व.)
sterile water, निर्जंतुक पाणी
sterilisation, *n.* निर्जंतुकीकरण (न.)
steriliser, *n.* निर्जंतुकरण यंत्र (न.)
sterilising oven, निर्जंतुकीकरण पेटी
sterility, *n.* निर्जंतुकता (स्त्री.)
sterility assurance, निर्जंतुकता हमी
sterility test, निर्जंतुकता चाचणी
stern layer, स्टर्न थर
*sticking, *n.* साचा आसंजन (न.)
stilette needle, तार सुची
still, *n.* ऊर्ध्वपातन उपकरण (न.)
still head, ऊर्ध्वपातन उपकरण शीर्ष
stimulant, *adj.* उद्दीपक
*n.* उद्दीपक (न.)
stimulate, *v.t.* उद्दीपन करणे
stimulation, *n.* उद्दीपन (न.)
stirrer, *n.* ढवळणी (स्त्री.)
stock solution, संग्रह द्रावण
stoichiometric number, तत्त्वानुपातिक अंक, स्टॉयकिओमेट्रिक अंक
stoichiometry, *n.* (*also* stoechiometry) तत्त्वानुपातिकी (स्त्री.), स्टॉयकिओमेट्री (स्त्री.)
stoke, *n.* स्टोक (न.) (विष्यंदितेचे परिमाण)
*Stokes' diameter, स्टोक व्यास
stomach, *n.* जठर (न.)
stomach buffering, आमाशय उभयरोधी
stomach tube, जठर नळी
stomatitis, *n.* मुखशोथ (पु.)
stopcock, *n.* तोटी (स्त्री.)
stopper, *n.* बूच (न.)
stoppering, *n.* बंद करणे (न.)
stopwatch, *n.* विराम घड्याळ (न.)
storage, *n.* संचय (पु.), साठा (पु.)
storage and release, संचय व मोचन
storage condition, संचय परिस्थिति

**strain**, *n.* १ ताण (पु.) २ प्रभेद (पु.)
**strain gauge**, ताण प्रमापी
**strain of animal**, १ प्राणि वंशप्रकार २ प्राणि प्रभेद
*stratum conjunctum*, संयोगी स्तर
*stratum corneum*, शृंगी स्तर
*stratum granulosum*, कणिका स्तर
*stratum lucidum*, स्वच्छ स्तर
**streak plate**, ओरखडा पट्टी
***streaming potential**, प्रवाह विभव
**streamline**, *n.* स्रोतरेषा (स्त्री.)
**streamline flow**, सुधारी प्रवाह
**stream scanning**, स्रोत समवेक्षण
**strength**, *n.* तीव्रता (स्त्री.)
**stress**, *n.* १ प्रताप (पु.) २ प्रतिबल (न.)
**stress ulcer**, प्रतापजन्य व्रण
**strip**, *n.* पट्टी (स्त्री.), पट्टा (पु.)
**strip packaging**, पट्टिका आवेष्टन, पट्टी आवेष्टन
**stroke output**, स्पंद निर्गम
**strong**, *adj.* तीव्र
**structural formula**, संरचना सूत्र
**structural modification**, संरचनात्मक बदल
***structure activity relationship**, संरचना–क्रिया संबंध
***structured vehicles**, संरचित वाही (पु.अ.व.)
**struggle response**, संघर्ष प्रतिसाद
**stunning**, *n.* मर्माघात (पु.)
*adj.* मर्माघाती
***stupor**, *n.* जडावस्था (स्त्री.)
**sub-**, *pfx.* १ अव - २ उप-
**subacute toxicity**, मध्यकालिक विषाक्तता
**subarachnoid haemorrhage**, अधोजालआवरण रक्तस्राव
**subcapsular cataract**, अवसंपुटी-मोतीबिंदु
**subcoat**, *n.* १ अधःस्तर (पु.) २ उपलेप (पु.)
**subcoating**, *n.* उपलेपन (न.)
**subculture**, *n.* उपसंवर्ध (पु.)
**subcutaneous**, *adj.* अधस्त्वचा–
**subdural haemorrhage**, अधोदृढआवरण रक्तस्राव
**sub inhibitory concentration**, *Microbiol.* अव-संदमी संहति
**subjective**, *adj.* व्यक्तिनिष्ठ *cf.* objective
**sublimation**, *n.* संप्लवन (न.)
**sublingual**, *adj.* अधोजिह्वा–
***sublingual tablet**, अधोजिह्वा वटिका
**subperiosteal haemorrhage**, अव-परिअस्थिक रक्तस्राव
**subsaturated**, *adj.* अवसंपृक्त
**subscription**, *n.* उपपत्रांश (न.) *cf.* prescription
**subside**, *v.i.* उपशम होणे
**subsidence**, *n.* अवसीदन (न.), अधोगमन (न.)
**subsidence of floccules**, ऊर्ण अधोगमन
**substrate**, *n.* कार्यद्रव्य (न.), क्रियाधार (पु.)
**suction potential**, चूषण विभव
**suet**, *n.* अजा वपा (स्त्री.), स्वेट (न.)
**sugarcoating**, *n.* शर्करावगुंठन (न.)
**sulfated polysaccharide**, सल्फेटित पॉलि-सॅकराइड
**sulphur**, *n.* (*also* sulfur) सल्फर (न.), गंधक (न.)
**summons**, *n.* समन्स (न.)
***sunscreen**, *n.* सौर संरक्षी (पु.), रोधक उपलेप (पु.)
**sunscreening agent**, सौर संरक्षी (कारक)
**super-**, *pfx* (*also* supra) १ अति - २ अधि-
**supercentrifuge**, *n.* द्रुत केंद्रोत्सारक (न.), सुपर सेंट्रिफ्यूज (न.)
**superficial anaesthesia**, उथळ संमोहन, उथळ बधिरावस्था
***superinfection**, *n.* अधिसंक्रमण (न.)
**supersaturation**, *n.* अतिसंपृक्ति (स्त्री.)
**superscription**, *n.* अधिपत्रांश (न.) *cf.* prescription

*supervised regimen of therapy, पर्यवेक्षित उपचार मालिका
supine, *adj.* उताणा
supportive treatment, आधारदायी उपचार
*suppository, *n.* वर्तिका (स्त्री.)
suppository molding, वर्तिका साचेकाम
suppression, *n.* दमन (न.)
suppressive, *adj.* दमनकारक
suppurative, *adj.* सपूय, पूयुक्त
supramaximal, *adj.* अधिमहत्तम
supramaximal shock, अधिमहत्तम आघात
supraventricular, *adj.* अधिनिलयी–
surface-active agent = surfactant
surface contact factors, पृष्ठ संपर्क घटक (पु.अ.व.)
surface film, पृष्ठ पटल
surface finishes, पृष्ठीय परिष्कार
surface tension, पृष्ठताण (पु.)
*surfactant, *n.* (*also* surface-active agent) पृष्ठक्रियाकारक (पु.), पृष्ठसक्रियक (पु.), पृष्ठतलकारक (पु.)
surgeon's mask, संरक्षक मुखवटा
surgical dressing, शल्य व्रणोपचार
surgical gauze, १ गॉझ (पु.) २ जालवस्त्र (न.)
surgical needle, शल्य सूचिका
susceptibility, *n.* विवशता (स्त्री.), ग्रहण क्षमता (स्त्री.)
susceptible, *adj.* विवश, ग्रहणक्षम
suspending, *adj.* निलंबी
suspending agent, निलंबक कारक
suspension, *n.* निलंबन (न.)
suspension and cancellation of the licence, लायसनचे निलंबन व ते रद्द करणे
sustained action dosage form, सतत कार्यकारी मात्रारूप
sustained release, सतत विमोचन
sustained release preparation, सतत विमोचनी मात्रारूप
suture, *n.* शिवण (स्त्री.)
*v.t.* शिवणे
swabbing, *n.* बोळ्याने पुसणे (न.)
sweating, *n.* स्वेदन (न.)
sweet clover disease, स्वीट क्लोव्हर रोग
sweetener, *n.* मधुरक (न.)
*swelling, *n.* शोफ (पु.), सूज (स्त्री.)
swelling of a gel, *Pharmaceutics* जेल शोफ, जेल फुगवटा
sympathetic, *adj.* अनुकंपी
sympathetic ophthalmia, अनुकंपी नेत्रशोथ
sympathetic tone, अनुकंपी तानता
sympathomimetic, *adj.* अनुकंपी अनुकारक
symptom, *n.* लक्षण (न.)
symptomatic, *adj.* लक्षणानुसारी
symptomatic treatment, लक्षणानुसारी उपचार
symptomatology, *n.* लक्षण समुच्चय (पु.)
syn-, *pfx.* १ सह - २ सं-
synaptic transmission, संपर्कस्थानी पारेषण
synchronise, *v.t. & i.* संकालन करणे, संकालन होणे
syncope, *n.* मूर्च्छा (स्त्री.)
syndiotactic, *adj.* सम-द्वि-व्यवस्थ–
syndrome, *n.* संलक्षण (न.)
*syneresis, *n.* सोत्सर्ग आकुंचन (न.)
*synergism, *n.* सहयोगिता (स्त्री.)
synergist and antagonist, सहयोगी व विरोधी
synergistic, *adj.* सहयोगी
synovial fluid, स्नेहल द्रव
synthesis, *n.* संश्लेषण (न.)
synthetic, *adj.* १ कृत्रिम २ संश्लेषित, संश्लेषण–
synthetic resin, १ कृत्रिम राळ २ संश्लेषित राळ
synthetic suture, कृत्रिम सूत्र
syphilis, *n.* उपदंश (पु.), गरमी (स्त्री.), सिफिलिस (पु.)

**syringe,** *n.* सिरिंज (स्त्री.), पिचकारी (स्त्री.)
**syringeability,** *n.* पिचकार्यता (स्त्री.)
**syrup coat,** सिरप लेप
**system,** *n.* १ पद्धति (स्त्री.) २ संस्था (स्त्री.) ३ रचना (स्त्री.)
**systematic error,** पद्धतशीर त्रुटि
**systemic,** *adj.* सार्वदेहिक, दैहिक
**systemic and nonsystemic antacids,** सार्वदेहिक आणि स्थानिक प्रत्याम्ले (न.अ.व.)
**systemic buffer,** दैहिक उभयरोधी
**systole,** *n.* प्रकुंचन (न.)

# T

**table drier,** मेज शुष्कक
***tablespoon,** *n.* मोठा चमचा (पु.)
***tablet,** *n.* वटिका (स्त्री.)
*cf.* lozenge, चूषिका
pellet, गुलिका
pill, गोळी
**tablet chipping,** वटिकेचे टवके उडणे
**tablet disintegration test,** वटिका विघटन चाचणी
**tableted inserts,** वटिकारूप निवेश (पु.अ.व.)
**tablet flaw,** वटिका दोष
**tablet fracture,** वटिका भंग
**tablet granulation,** वटिका कणिकायन
**tablet press,** (*also*. called **punch press**) वटिका दाबयंत्र
**tablet stability,** वटिका स्थैर्य
**tablet strength,** वटिका बल
**tabletting,** *n.* वटिकायन (न.)
**tablet uniformity,** वटिका समरूपता
**tablet weight variation,** वटिका वजन विचरण
**tachyarrhythmia,** *n.* लयहीन हृद्क्षिप्रता (स्त्री.)
**tachycardia,** *n.* हृद्क्षिप्रता (स्त्री.)
***tachyphylaxis,** *n.* क्षिप्रप्रतिरक्षा (स्त्री.)
**tactile characteristics,** स्पर्श वैशिष्टचे (न.अ.व.)
**taint,** *v.i.* कलूषण होणे
**tainting of contents,** अंत:पदार्थांचे कलूषण
**talc,** *n.* संगजिरा (पु.)
**tamper-proof,** *adj.* अंत:क्षेप रोधी
**tampon,** *n.* (plug) बोळा (पु.)
**tannin,** *n.* टॅनिन (न.)
**tapeworm infection,** पट्टकृमि संक्रमण, फीतकृमि संक्रमण
**target gland,** लक्ष्य ग्रंथि
**task force on prescription drug,** निर्देशित औषधांसाठी कार्यबल
**tautomeric forms,** चलसमघटक रूपे (न.अ.व.)
**tautomerism,** *n.* चलसमघटकता (स्त्री.)
**tax-free alcohol,** करमुक्त अल्कोहोल
**taxoplasmosis,** *n.* टॅक्सोप्लाझ्मारोग (पु.)
***teaspoon,** *n.* लहान चमचा (पु.)
**telangiectasia,** *n.* केशवाहिनीस्फीति (स्त्री.)
**telophase,** *n.* अंत्यावस्था (स्त्री.)
**temperature,** *n.* तपमान (न.), तापमान (न.)
**temperature coefficient,** तापमान गुणांक
**tenacious,** *adj.* चिकट
**tenesmus,** *n.* त्रासयुक्त उत्सर्ग भावना (स्त्री.)
**tensile compliance,** तन्य अनुवृत्ति
**tensiometer,** *n.* पृष्ठताणमापी (न.)
**tension,** *n.* १ ताण (पु.), तणाव (पु.) २ दाब (पु.)
***teratogenicity,** *n.* अपरूपजनकता (स्त्री.)
**terminology,** *n.* परिभाषा (स्त्री.)

ternary liquid system, त्रि-द्रव पद्धति
ternary system, त्रिक संस्था
tester, *n.* परीक्षित्र (न.)
testing hypersensitivity, अतिसंवेदना चाचणी
test solution, चाचणी द्राव
tetany, *n.* टेटॅनी (न.)
tetracycline, *n.* टेट्रासायक्लिन (न.)
theca, *n.* कवच (न.)
theobroma oil, थिओब्रोमा तेल
theory, *n.* उपपत्ति (स्त्री.), सिद्धांत (पु.)
therapeutic, *adj.* उपचारार्थ, उपचारशास्त्रीय
therapeutic abortion, उपचारार्थ गर्भपात
therapeutic activity, उपचारी क्रिया
therapeutic dose, उपचारी मात्रा
therapeutic effect, उपचारी परिणाम
therapeutic efficacy, उपचार क्षमता
therapeutic equivalence, रोगनिवारक सम-तुल्यता
therapeutic incompatibilities, उपचार-शास्त्रीय असंयोज्यता
*therapeutic index, उपचार निर्देशांक
*therapeutic plasma concentration range, उपचारी रक्तद्रव-संहति व्याप्ति
therapeutics, *n.* उपचारशास्त्र (न.)
therapeutic utility, उपचारशास्त्रीय उप-युक्तता
therapy, *n.* उपचार (पु.)
thermal analysis, औष्णिक विश्लेषण
thermal conductivity detector, औष्णिक वाहकता संसूचक
thermal death time, औष्णिक मृत्युकाल
thermal foam, औष्णिक फेन
thermal method of sterilisation, निर्जंतुकी-करणाची औष्णिक पद्धती
thermal shaving foam dispenser, औष्णिक श्मश्रु फेन योजक
thermistor, *n.* थर्मिस्टर (पु.)
thermocouple, *n.* तापयुग्म (न.)
thermodynamics, *n.* ऊष्मागतिकी (स्त्री.)
thermogravimetric analysis, ऊष्माभारमितीय विश्लेषण
thermogravimetry, *n.* ऊष्माभारमिति (स्त्री.)
thermoplastic, *adj.* तापआकार्य
thermoplastic resin, तापआकार्य रेझिन
thermoset, *n.* ऊष्मादृढ पदार्थ (पु.)
thermostable, *adj.* उष्ण अविनाशी
thickening, *n.* स्थूलन (न.)
thickening agent, सांद्रताकारक (पु.)
thin layer chromatography, तनुस्तर वर्णलेखन
*thixotropic coefficient, क्षोभप्रवाहिता गुणांक
thixotropic index, क्षोभप्रवाहिता निर्देशांक
*thixotropy, *n.* क्षोभप्रवाहिता (स्त्री.)
threatened abortion, संभाव्य गर्भपात, गर्भ-पाताचा धोका
three-compartment open model, त्रि-कक्ष विवृत प्रतिमान
three-phase aerosol, त्रि-प्रावस्थी सूक्ष्म-तुषारित्र
three-way, *adj.* त्रिमार्गी
threshold, *n.* प्रभावसीमा (स्त्री.)
aversive threshold, विमुखता प्रभावसीमा
nociceptive threshold, दुःख प्रभावसीमा
pain threshold, वेदना प्रभावसीमा
squeak threshold, चित्कारण प्रभावसीमा
*threshold dose, प्रभावसीमा मात्रा, प्रभावदर्शी किमान मात्रा
*threshold potential, प्रभावदर्शी विभव
*throat paint, थ्रोट पेंट, घसा लेप
thrombocyte, *n.* बिंबाणु (पु.)
thrombocytopenia, *n.* बिंबाणु अल्पता (स्त्री.)
thrombocytopenic purpura, बिंबाणुअल्पता-जन्य नीलारुणता
thrombogenesis, *n.* घनास्रजनन (न.)
thrombokinase, *n.* थ्रॉम्बोकायनेज (न.)
thrombolytic agent, घनास्रलयी कारक

thromboplastin, *n.* थ्रॉम्बोप्लास्टिन (न.)
thrombosis, *n.* घनास्त्रता (स्त्री.)
thrombotic, *adj.* घनास्त्री
thrombus, *n.* घनास्त्र (पु.)
thrombus formation, घनास्त्र निर्मिति
through-circulation drier, अधःस्रोत शुष्कक
through-circulation drying, अधःस्रोत शुष्कन
thyme, *n.* अजोवान (पु.), ओवा (पु.)
thymus derived lymphocytes, उरोधिष्ठ ग्रंथि-जन्य लसीकापेशी (स्त्री.अ.व.)
thyrotoxic crisis, अवटु विषमयीसीमा
thyrotoxicosis, *n.* अतिअवटुविषमयता (स्त्री.)
*tie line, बंधनरेषा (स्त्री.), टाय लाईन
*tight closed, (*also* securely closed) घट्ट बंद (केलेला)
tightening sensation, आवळले जाण्याची संवेदना, आवळल्यासारखे वाटणे
timed disintegration tablet, नियत विघटनी वटिका
*time released capsule, नियत मोचनी संपुटिका, नियत मोचनी कॅप्सुल
time-survivor curve, काल-शेष जीवित वक्र
tincture, *n.* अल्कोहोली अर्क (पु.), टिंक्चर (न.)
tinnitus, *n.* कर्णनाद (पु.)
tissue, *n.* ऊति (स्त्री.)
*tissue affinity, ऊति आसक्ति
tissue compartment, ऊति कक्ष
tissue extract, ऊति अर्क
tissue transplant, ऊति रोपण
titration, *n.* अनुमापन (न.)
titrimetric assay method, अनुमापनी आमापन पद्धति
toiletry cosmetics, प्रसाधने (न.अ.व.)
tolerance, *n.* सह्यता (स्त्री.)
tolerance in dispensing, ग्राह्यमर्यादा (स्त्री.)
tomography, *n.* छेदचित्रण (न.)
tonic, *n.* शक्तिवर्धक (न.)
tonic centre, ताणता केंद्र
tonicity, *n.* ताणता (स्त्री.)
tonicity contributor, ताणता साहाय्यकारी
topical, *adj.* पृष्ठीय, पृष्ठ–
topical action, पृष्ठीय क्रिया
topology, *n.* १ संस्थितिविज्ञान (न.) २ संस्थिति (स्त्री.)
torque testing, पीळ चाचणी
total differential equation, पूर्ण विकलन समीकरण
tourniquet, *n.* पीळ बंध (पु.)
toxaemia, *n.* (*also* toxemia) विषमयता (स्त्री.)
toxicant, *adj.* विषकारी
toxic dose, विषारी मात्रा
toxic effect, विषारी परिणाम
toxic encephalopathy, विषाक्त मस्तिष्क-विकृति
toxicity, *n.* विषता (स्त्री.), विषावसान (न.), विषपरिणामता (स्त्री.), विषालुता (स्त्री.)
toxicology, *n.* विषशास्त्र (न.)
toxic therapeutic ratio, विषाक्त उपचार गुणोत्तर
toxoid, *adj.* १ विषाभ २ निर्विष्क
toxoid antitoxin floccule, विषाभ प्रतिजीव-विष ऊर्णिका
*toxophore, *n.* क्रियाकारक (पु.) *cf.* haptophore
trace element, लेशमात्र मूलद्रव्य
tracer technique, अनुलक्षक तंत्र
trachea, *n.* श्वासनलिका (स्त्री.)
tracheobronchial, *adj.* श्वासनलिका-श्वसनी-, नलिका-श्वसनी-
trachoma, *n.* खुपऱ्या (स्त्री.अ.व.)
trademark, *n.* व्यापार चिन्ह (न.)
*tranquilliser, *n.* मनःशामक (न.)
transcellular, *adj.* पारपेशिक

**transcription,** *n.* प्रतिलेखन (न.)
**transduction,** *n.* पारगमन (न.)
**transection,** *n.* १ पारछेद (पु.) २ पारछेदन (न.)
**transferable species,** स्थानांतरणशील जाति
**transfer cart,** स्थानांतरण गाडी
**transference number,** (*also* transport number *or* called Hittorf number) विद्युत वहनांक, प्रवहनांक (पु.), हिटॉर्फ अंक
**transfer reaction,** स्थानांतर अभिक्रिया
**transformation,** *n.* रूपांतरण (न.)
**transfusion,** *n.* पराधान (न.)
**transfusion hazard,** पराधानी धोका
**transient,** *adj.* अल्पस्थायी
**transient glaucoma,** अल्पस्थायी काचबिंदु
**transition element,** संक्रमण मूलद्रव्य
**transition flow,** असंतत प्रवाह, खंडित प्रवाह
**transition state theory,** संक्रमणावस्था सिद्धांत
**transmissivity,** *n.* पारगम्यता (स्त्री.), पारगमनक्षमता (स्त्री.)
***transmitter,** *n.* १ पारेषणित्र (न.) २ पारेषक (पु.)
**transplantation,** *n.* आरोपण (न.), प्रतिरोपण (न.)
**transplant rejection,** प्रतिरोपण नकार
**transport number** = transference number
**trauma,** *n.* आघात (पु.)
**travellers' diarrhoea,** प्रवासी अतिसार
**travelling wave liner accelerator,** गामी तरंग रेखीय त्वरक
**tray drier,** तबक शुष्कक
**treatment,** *n.* उपचार (पु.)
**tremor,** *n.* कंप (पु.)
**tremulousness,** *n.* कापरेपणा (पु.)
**trichinosis,** *n.* (*also* trichiniasis) ट्रिचिनेला संसर्ग (पु.)
**trichomone infection,** ट्रायकोमोन संक्रमण
**trichomoniasis,** *n.* त्रिशिख विकार (पु.)
**trigeminal neuralgia,** त्रिशाख चेतनी शूल, त्रिशाख चेतार्ति
**triglycerides,** *n. pl.* ट्रायग्लिसेराइडे (न.अ.व.)
**trigonal hybridisation,** त्रिभुज संकरण
**trigonal orbital,** त्रिभुज कक्षिका
**trimester,** *n.* त्रिमासिक (न.)
**triple molecular bond,** तिहेरी रेणु-बंध
**triple point,** त्रिक बिंदु
**triple roller mill,** तीन रोलर मसृणी, तीन रोलर दळणयंत्र
**triturate,** *v.t.* घोटणे, खलणे, संपेषण करणे
**trituration,** *n.* संपेषण (न.)
**trivalent,** *adj.* त्रिसंयुजी
**trivial name,** प्रचलित संज्ञा
***troche** = lozenge
**trophic hormone,** पोषक संप्रेरक
**trophozoite,** *n.* पारपेशिका (स्त्री.)
**trough mixer,** द्रोणी मिश्रणी
**truck drier,** शकट शुष्कक
**true,** *adj.* वास्तव, यथार्थ, सत्य
**true causal prophylactic,** वास्तवकारणलक्षी प्रतिबंधक
***true tolerance,** वास्तव सह्यता
***true volume,** वास्तव आकारमान
**truncation,** *n.* तिर्यक छेदन (न.)
**tube mill,** नलिका दळणयंत्र
**tuberculine reaction,** ट्युबरक्युलीन प्रतिक्रिया
**tuberculosis,** *n.* क्षय (पु.), क्षयरोग (पु.), यक्ष्मा (पु.)
**tubular,** *adj.* (bandage) नलिकाकार
**tubular bowl centrifuge,** नलिकाकार पात्र केंद्रोत्सारक
**tubular reabsorption,** नलिकीय पुनःशोषण
**tubular secretion,** नलिकीय स्राव
**tularaemia,** *n.* तुलारीरोग (पु.)
**tumbler drier,** गडगडे शुष्कक
**tumbler mixer,** गडगडी मिश्रणी

tumour, *n.* अर्बुद (पु.), ट्युमर (पु.)
tumour marker, अर्बुद चिह्नक
tunnel drier, सुरंग शुष्कक, भुयारी शुष्कक
turbidimetry, *n.* गढूळतामिति (स्त्री.)
turbine, *n.* टर्बाईन (न.)
turbo-tray drier, वर्तित्र तबक शुष्कक
turbulent flow, क्षुब्ध प्रवाह
turbulent mixing, क्षुब्ध मिश्रण
tussal, *adj.* खोकल्यासंबंधी, कास–
twin-crossover design, विशिष्ट क्रमबदल संकल्पन
twin-shell blender, द्विकवची अभिमिश्रणी
twitching, *n.* स्फुरण (न.)
two-compartment open model, द्वि-कक्ष-विवृत प्रतिमान
Tyndall effect, (*also* Tyndall phenomenon) टिंडाल परिणाम
tyndallisation, *n.* खंडित निर्जंतुकीकरण (न.), टिंडलीकरण (न.)
Tyndall phenomenon = Tyndall effect
typhus, *n.* प्रलापक (पु.)

# U

ulcer, *n.* व्रण (पु.)
ulcerative colitis, व्रणीय बृहदांत्रशोथ
ultra-, *pfx.* परा–, अतीत
ultracentrifuge, *n.* पराअपकेंद्रित्र (न.)
ultrafiltration, *n.* परागालन (न.), परानिस्यंदन (न.)
ultrasonifier, *n.* स्वनातीतजनक (पु.)
ultraviolet, *adj.* जंबुलातीत, पराजंबु–
ultraviolet light, जंबुलातीत प्रकाश
uncontrolled, *adj.* अनियंत्रित
uncoupling, *adj.* अयुग्मनी
uncoupling oxidative phosphorylation, ऑक्सिडी फॉस्फोरिलेशन वियुग्मन
underpads, *n. pl.* शोषक कूर्चा (स्त्री.अ.व.)
unilateral, *adj.* एकपार्श्विक, एक पार्श्व–
unintentional incompatibility, अहेतुक असंयोज्यता
uni-strip packer, एक-एक मात्रा पट्टी आवेष्टक
unit, *n.* एकक (न.)
unitage, *n.* एकक पद्धति (स्त्री.)
unit-dose dispensing, एकक मात्रा वितरण
unit-dose packaging, एकक मात्रा वेष्टन
universal, *adj.* सार्वत्रिक, सर्वयोग्य, सर्वंकष, वैश्विक
universal antidote, सर्वकामी विषरोधी
universal buffer mixture, सर्वंकष उभयरोधी मिश्रण
unknown amount of drug, औषधाची अज्ञात राशि
unlabelled, *adj.* अंकनरहित
unregistered, *adj.* अनोंदणीकृत, नोंदणी न केलेला
unregistered persons, नोंदणी न केलेल्या व्यक्ती (स्त्री. अ.व.)
unsaponifiable matter, असाबणनक्षम द्रव्य
unsaturated, *adj.* असंपृक्त
unsaturated acid, असंपृक्त आम्ल
unsupervised regimen, अपर्यवेक्षित उपचार
untoward, *adj.* अनिष्ट
untoward reaction, अनिष्ट प्रतिक्रिया
upper consolute temperature, संद्रावणीय अधितपमान (कलिलांच्या संदर्भात)
upper motoneuron disorder, ऊर्ध्व प्रेरक चेतापेशी विकार

**uraemia,** *n.* (*also* uremia) अतिमूत्रघटक रक्तता (स्त्री.), मूत्रविषरक्तता (स्त्री.)
**uricosuria,** *n.* युरिकाम्लमूत्रता (स्त्री.)
**uricosuric agent,** युरिकाम्ल मूत्रक
**urinary cast,** मूत्र निर्मोक
**urinary catheter,** मूत्र शलाका
**urinary excretion,** मूत्र उत्सर्जन
**urinary retention,** मूत्रावरोध (पु.)
**urinary tract,** मूत्र मार्ग
**urokinase,** *n.* युरोकायनेज (न.)
**urological,** *adj.* मूत्रोत्सर्ग शास्त्रीय
**urticaria,** *n.* पित्त उठणे (न.), गांधी उठणे (न.)
**use-dilution test,** वापर विरलन चाचणी
**uterine inertia,** गर्भाशय जडता
**uterine involution,** गर्भाशय प्रत्यावर्तन
**uterine relaxant,** गर्भाशय शिथिलकारी
**uterine segment,** गर्भाशय खंड
**uveitis,** *n.* असितपटलशोथ (पु.)

# V

**vaccine,** *n.* लस (स्त्री.)
**vacuumstat,** *n.* निर्वातस्थायी (पु.)
***vagolytic,** *adj.* भ्रमणचेतालयी
**valency,** *n.* संयुजा (स्त्री.)
**valvular heart disease,** हृदयाच्या झडपेचा रोग, वल्लकी रोग, कपाटिका रोग
**Vane pump,** व्हेन पंप
**vanishing cream,** अंतर्धानी उपलेप
**vanishing cream base,** अंतर्धानी उपलेप आधारद्रव्य
**vapour,** *n.* बाष्प (न.)
**vapour density,** बाष्प घनता
**vapour phase chromatography,** (*also* called gas chromatography) बाष्प वर्णलेखन (वायु वर्णलेखन)
**vapour pressure,** बाष्प दाब
**vapour recompression,** बाष्प पुन:संपीडन
**variance,** *n.* प्रचरण (न.)
**variant angina pectoris,** परिवर्तनशील उर:शूल
**variation,** *n.* विचरण (न.), विभेदन (न.), विभेद (पु.)
**variation in estimates,** अंदाजातील तफावत
**varicose ulcer,** अपस्फीत व्रण
**vascular insufficiency,** वाहिनी कार्यन्यूनता
**vasculature,** *n.* वाहिनी संकुल (न.)
**vasoactive intestinal polypeptide,** वाहिनी क्रियाशील आंत्रीय बहुपेप्टाइड
**vasoconstriction,** *n.* वाहिनी संकोचन (न.)
**vasoconstrictor,** *n.* वाहिनी संकोचक (न.)
**vasodilatation,** *n.* वाहिनी विस्फारण (न.)
**vasodilator,** *n.* वाहिनी विस्फारक (न.)
**vasopressor,** *n.* वाहिनी दाबवर्धी (पु.)
**vasovagal reaction,** वाहिनी-भ्रमणचेता प्रतिक्रिया
**vasovagal syncope,** वाहिनी-भ्रमणचेता मूर्च्छा
**vector,** *n.* रोग प्रसारक (पु.), रोगवाहक (पु.)
**vegetable,** *n.* १ वनस्पति (स्त्री.) २ शाक (स्त्री.)
**vegetable oil,** वनस्पति तेल
**vegetative bacteria,** वर्धी जीवाणू (पु.अ.व.)
**vehicle,** *n.* वाहन (न.)
**velocity,** *n.* वेग (पु.)
**velocity distribution,** वेग वितरण

velocity gradient, (*also* called rate of shear) वेग प्रवणता

velocity profile, वेग रूपरेखा

venous thrombosis, शिरा घनास्रता

vent, *n.* निर्गममार्ग (पु.)

ventilatory failure, वायुवीजन पात

ventricular, *adj.* निलय–

ventricular arrhythmia, निलयी लयहीनता

ventricular fibrillation, निलयी विकंपन

ventricular tachycardia, निलय हृद्‌क्षिप्रता

venturimeter, *n.* (*also* venturi) प्रवाहमापी (पु.), वेंटुरीमापी (पु.)

verification and storage of spirit, स्पिरीटची पडताळणी व साठा

versator, *n.* व्हर्सेटर (न.) (मिश्रणक्रियेमध्ये हवा पाशित होऊ नये म्हणून वापरण्याचे एक उपकरण)

vertical, *adj.* उभा, उदग्र

vertical mixer, उभी मिश्रणी

vertigo, *n.* गरगरणे (न.), भोवळ (स्त्री.), घेरी (स्त्री.)

vesicant, *n.* पुटिकाकारक (पु.)

vesicular exanthema, द्राक्षाभ उद्रेक

vestibular defect, प्रघाणीय दोष

viable count, जीवनक्षम गणनांक, जननपेशी गणनांक

*vial, *n.* कुपिका (स्त्री.), कुपी (स्त्री.), छोटी बाटली (स्त्री.)

vibration milling, कंप-दलन (न.)

vibratory mill, कंपनशील मिल

viral disease, विषाणुजन्य रोग

virility, *n.* (*also* virilism) पुं-वत्ता (स्त्री.)

virulence, *n.* जहालपणा (पु.), जहालता (स्त्री.)

virulent organism, जहाल जंतु, जहाल जीव

virus, *n.* विषाणु (पु.)

visceral pain, आंतरांगी वेदना

viscid, *adj.* सांद्र, चिकट

viscometer, *n.* विष्यंदितामापी (पु.)

*viscosity, *n.* १ सांद्रता (स्त्री.) २ विष्यंदिता (स्त्री.)

viscosity improver, विष्यंदिता सुधारक

viscous drag, विष्यंदी अवरोध, विष्यंदी कर्षण

visual acuity, *n.* दृष्टितीक्ष्णता (स्त्री.)

visual cycle, दृक् आवर्तन

vitamin, *n.* व्हिटॅमिन (न.), जीवनसत्त्व (न.)

vitamin $B_6$, (*also* anti-acrodynia rat factor) जीवनसत्त्व $बी_६$

vitreous haemorrhage, काचाभ-द्रव रक्तस्राव

vocalisation, *n.* वाचीकरण (न.)

void volume, रिक्त आयतन

volatile, *adj.* बाष्पनशील

volatile oils, बाष्पनशील तेले (न.अ.व.)

volume contraction, आकारमान आकुंचन

volume of distribution, वितरण आकारमान

volume receptor, आकारमान ग्राही, आयतन ग्राही

volume tolerance, आकारमान सहनक्षमता

volumetric, *adj.* आकारमानी

volumetric graduates, आकारमानी अंशांकिते (न.अ.व.)

volute pump, व्होल्यूट पंप

vomiting, *n.* वांति (स्त्री.), वमन (न.)

vulcanisation, *n.* व्हल्कनन (न.)

# W

warehousing facility, वखार सुविधा
warning, *n.* इशारा (पु.)
warning card, सूचना पत्र
wart, *n.* चामखीळ (स्त्री.), त्वचांकुर (पु.)
washing device, धुलाई साधन
watercress, *n.* जल पत्ती (स्त्री.)
water for injection, अंतःक्षेपण जल
water in oil, तैलांतर्गत जल
water load, जल भार
waterload test, जलभार चाचणी
water number, जलांक (पु.)
waterproofing, *n.* जलरोधन (न.)
water removable, जल प्रक्षालनीय
water soluble, जल द्राव्य
water-soluble base, जलद्राव्य आधारद्रव्य
water-soluble vitamins, जलद्राव्य जीवनसत्त्वे (न.अ.व.)
wax based granulations, मेण आधारित कणिका (स्त्री.अ.व.)
weathering, *n.* अवक्षीणन (न.)
weedicide, *n.* तणनाशक (न.)
weighing boat, तोलनौका (स्त्री.)
*weight and size, आकारमान आणि वजन
weight tolerance, भार सहनक्षमता
weight variation test, भार बदल चाचणी, भार विचरण चाचणी
weight variation tolerance, भार विचरण सह्यता
*well-closed, *adj.* व्यवस्थित बंद (केलेला)
West's time temperature integrator, वेस्टचे वेळ-तपमान समन्वयक
wet bulb depression, सद्रव बल्ब अवनमन
wet bulb temperature, आर्द्र फुगा तापमान
wet grinding, सद्रव पेषण
*wet gum method, आर्द्र डिंक पद्धति
wet method, आर्द्र पद्धति
wet point, आर्द्र बिंदु
wet scrubber, आर्द्र मार्जनी, ओली घासणी
*wet seal, आर्द्रसील (न.) जलसील (न.)
wetting, *n.* आर्द्रण (न.)
wetting agent, भिजवक (पु.)
wheal, *n.* गांध (स्त्री.)
wheeze, *n.* शीळसदृश श्वसन (न.)
whipworm infection, प्रतोदकृमि संक्रमण
white thrombus, श्वेत घनास्त्र
wholesale of drugs, औषधांची घाऊक विक्री
wine, *n.* वाइन (स्त्री.)
withdrawal bleeding, प्रत्याहरण रक्तस्राव
withdrawal symptom, प्रत्याहरण लक्षण
withdrawal technique, प्रत्याहरण तंत्र
*witness tube, निर्जंतुकरणदर्शक नलिका
woolfat, *n.* ऊर्णा मेद (पु.)
work areas, कामाच्या जागा (स्त्री.अ.व.)
work function, (*also* work potential) कार्य विभव
worm infection, कृमि संक्रमण
wound disruption, क्षत विदरण
wound dressing, व्रणोपचार (पु.)
wrench, *n.* अनुयोजी पाना (पु.)
*writhing, *n.* तगमग (स्त्री.)
writhing syndrome, वेदनाजन्य तगमग

# X

*xerogel, *n.* शुष्क जेल (न.)
xerophthalmia, *n.* शुष्कनेत्रता (स्त्री.)
xerosis, *n.* कोरड (स्त्री.), शुष्कता (स्त्री.)
X-radiation, *n.* क्ष-किरणोत्सार (पु.)
X-ray, *n.* क्ष-किरण (पु.)
X-ray crystallographic analysis, क्ष-किरणा-द्वारे स्फटिक विश्लेषण
X-ray diffraction, क्ष-किरण विवर्तन
xylenol, *n.* झायलेनॉल (न.)

# Y

yaws, *n.* यॉज (पु.), यॉज रोग (पु.)
yellow card for reporting adverse drug reactions, विपरीत औषध प्रतिक्रिया पत्र
yellow fever vaccine, पीत ज्वर लस
*yield value, प्राप्ति मूल्य

# Z

zeotropic, *adj.* (mixture) विशिष्ट बाष्पी
zero defect concept, शून्य दोष संकल्पना
zero order, शून्य कोटि
zero-order kinetics, शून्य-कोटि गतिकी
zero-order reaction, शून्य-कोटि प्रतिक्रिया
zeta potential = electrokinetic potential
*zona fasciculata*, पुलिका स्तर
*zona glomerulosa*, गुच्छक स्तर
*zona reticularis*, जालिका स्तर
zone electrophoresis, क्षेत्र विद्युतकणसंचलन
zwitterion, *n.* त्स्विटरआयन (पु.)
*zwitterionic colloid, (*also* ampholytic colloid) त्स्विटरआयनी कलिल, उभयलय-रागी कलिल

# a

**acquired tolerance**

Tolerance developed on repeated administration of a drug.

**उपार्जित सह्यता**

औषध वारंवार दिल्यानंतर निर्माण झालेली सह्यता.

**active principles**

The chemical substance in drugs which cause changes in activity of the body.

**क्रियाशील तत्त्वे**

शरीरक्रियेत बदल घडवून आणणारे औषधातील रासायनिक पदार्थ.

**active transport**

Specialised carrier mediated mechanism to assist transmembranous transfer of drugs.

**सक्रिय परिवहन**

पारपटलातून औषधाचे वहन होण्यासाठी साह्यभूत असलेली विशेष कार्यवाहक मध्यस्थ यंत्रणा.

**addiction**

Previously the term 'addiction' was used to denote the phenomenon involving both psychological and physical dependence on drugs.

**आसक्ति**

औषधांची मानसिक व शारीरिक अवलंबिता निर्माण झालेली स्थिती दर्शविण्यासाठी पूर्वी 'व्यसन' ही संज्ञा वापरली जात असे.

**additive effect**

Phenomenon termed when the total action of two or more drugs administered together in equivalent to the summation of their individual actions.

**समावेशी परिणाम**

एकाच वेळी दिलेल्या दोन किंवा अधिक औषधांचा एकूण परिणाम त्यांच्या प्रत्येकाच्या परिणामांच्या बेरजेएवढा होणे.

**additive properties**

Physical properties dependent on the number and kind of atoms in a molecule; they can be calculated from a few fundamental constants describing similar properties of atoms or groups. e.g. molar volume, atomic weight.

**समावेशी गुणधर्म**

रेणूतील अणूंची संख्या व प्रकार यांवर अवलंबून असलेले भौतिक गुणधर्म; अणूंच्या किंवा गटांच्या तशाच गुणधर्मांच्या काही मूळ स्थिरांकांवरून ते काढता येतात. उदा. ग्रॅमरेणु आकारमान, अणुभार.

| | |
|---|---|
| **adiabatic expansion** *Thermodynamics* | **समोष्ण प्रसरण** |
| A change in volume or pressure without a loss or gain of heat. | वस्तूच्या उष्णतेत वाढ किंवा घट न होता तिचे आकारमान किंवा दाब यातील बदल. |
| **adulteration** | **अपमिश्रण, भेसळ** |
| A mixture with inferior or less potent material with a genuine material (drug). | हलक्या प्रतीच्या किंवा कमी क्षमतेच्या पदार्थाचे अस्सल पदार्थाबरोबर (औषधाबरोबर) केलेले मिश्रण. |
| **adverse reaction** | **प्रतिकूल प्रतिक्रिया** |
| Any response to a drug that is noxious and unintended and that occurs at doses used in man for prophylaxis, diagnosis or therapy. | पूर्वप्रतिरक्षा, निदान किंवा उपचार यांसाठी माणसांना दिलेल्या औषधाचा अपायकारक किंवा अहेतुक असा कोणताही प्रतिसाद. |
| **aerosol** | **एरोसॉल, सूक्ष्मफवारा, सूक्ष्मतुषार** |
| Colloid system in which solid or liquid particles are suspended in air or gas, especially a suspension of a drug to be dispensed in a fine spray or mist. | स्थायूचे किंवा द्रायूचे कण हवेमध्ये किंवा वायूमध्ये निलंबित असलेली, विशेषत: सूक्ष्म फवाऱ्याच्या किंवा तुषारांच्या स्वरूपात वितरित करावयाच्या औषधि-निलंबनाचा समावेश असलेली कलिलपद्धती. |
| **agonist** | **प्रचालक** |
| A drug which initiates pharmacological action after combining with the receptor. | ग्राहीशी संयोग झाल्यानंतर औषधशास्त्रीय क्रियेला चालना देणारे औषध. |
| **akathisia from antipsychotic drugs** | **मनोदुर्दशारोधी औषधांमुळे होणारा ॲकाथिशिआ** |
| A morbid fear of sitting down or to lie, leading to restlessness. | अस्वस्थतेत परिणती होणारी, बसून रहाण्याचे किंवा आडवे होण्याचे भय वाटण्याची विकृत अवस्था. |
| **Alcoholics' Anonymous** | **अल्कोहोलिक्स ॲनानिमस** |
| A well-known self-help organisation for both "non-practicing", and "practicing" alcoholics that has the primary goal of perpetual sobriety for its members. | "मद्य सोडलेले" आणि "मद्य घेणारे" यांसाठी ही सुप्रसिद्ध आत्मसहाय्य संघटना असून आपल्या सदस्यांना मद्यापासून कायमची मुक्ती मिळावी, हे या संघटनेचे मूळ उद्दिष्ट आहे. |

**alcoholism** — **मद्यात्यय, मद्यातिरेक**

Behavioural disorder manifested by excessive consumption of alcoholic beverages to an extent that interferes with the patient's health, economic functioning; some degree of habituation, dependence or addiction is implied.

रुग्णाच्या आरोग्यावर आणि आर्थिक परिस्थितीवर विपरीत परिणाम होईल अशा अतिरिक्त प्रमाणात अल्कोहोलयुक्त पेयांच्या सेवनामुळे निर्माण झालेला वर्तनातील बिघाड; याद्वारे मद्यासक्ती, काही प्रमाणात सवय लागणे, अवलंबून असणे किंवा आसक्ती सूचित होते.

**allergy** (hypersensitivity) — **ॲलर्जी, असात्मीयता**

A state of abnormal, strong responsiveness with the action of any external agent.

कोणत्याही बाह्य पदार्थाच्या क्रियेमुळे मिळणारा अपसामान्य व तीव्र प्रतिसाद.

**alligation** — **प्रमिश्रण**

It is a type of calculation involving mixing of two similar preparations but of different strength to produce a preparation of intermediate strength.

मध्यम क्षमतेचा सिद्ध पदार्थ तयार करण्यासाठी निरनिराळ्या क्षमतेचे परंतु दोन सारख्या सिद्ध पदार्थांचे मिश्रण करण्यासाठी ठरवलेली आकडेमोडीची पद्धत.

**amalgam filling** — **पारदमिश्र भरण**

For dental cavity.

दातांसाठी.

**ampule** — **चंबुकी, ॲम्पूल**

These are all-glass containers with a constricted or plain type neck varying in size intended for holding water/solvent/solution for injection.

इंजेक्शनसाठी द्रव ठेवण्याकरिता गळ्यापाशी संकुचित आकाराची काचेची धारकपात्रे.

**analeptic** — **१ श्वसनोद्दीपक २ संजीवक**

A drug that acts as a restorative such as caffeine.

पूर्ववत् कारक, कॅफीनसारखे औषध.

**anaphylaxis** — **अपप्रतिरक्षा**

A condition of hypersensitiveness to certain foreign proteins.

बाह्य (परकीय) प्रथिनांमुळे निर्माण होणारी अतिसंवेदिता.

**angle of repose** — **विश्राम कोन**

Maximum angle possible between the surface of a pile of powder and horizontal plane.

पावडरच्या ढिगाचा पृष्ठभाग व सपाट तळ यांमधील सर्वाधिक कोन.

**antagonism**

Opposition or contrariety between drugs.

**विरोधिता**

औषधांमधील विरोध किंवा असंबद्धता.

**antidote**

An agent that counteracts a poison.

**विषघ्न, उतारा, विषरोधी**

विषाचे परिणाम विफल करणारा कारक.

**antifatigue test**

For the postponement of the occurance of fatigue (Psychopharmacology).

**श्रांतिरोध चाचणी**

श्रांतिपूर्व कालावधी वाढविण्याची चाचणी (मनोऔषधशास्त्राच्या संदर्भात).

**antimetabolite**

A substance bearing a close structural resemblance to one required for normal physiological functioning and exerting its effect by interfering with the utilisation of the essential metabolite.

**प्रतिचयापचयक**

सर्वसाधारण शरीरक्रिया घडून येण्यासाठी आवश्यक असलेल्या पदार्थाशी खूपच संरचनात्मक साम्य असलेला आणि आवश्यक चयापचयकांच्या वापरामध्ये हस्तक्षेप करून आपला प्रभाव पाडणारा पदार्थ.

**antithixotropy**

Isothermal and comparatively slow loss, on standing of a material, of consistency gained through shearing.

**प्रतिचालनप्रवाहिता**

कर्तनामुळे आलेली सांद्रता, पदार्थ स्थिरावल्यावर समतापी व तुलनात्मक दृष्टया हळूहळू जाण्याची क्रिया.

**antitussive**

A drug used in the symptomatic treatment of cough.

**कासरोधी**

खोकला या लक्षणावरील उपशामक औषध.

**aperient**

A very mild purgative particularly applied to mild purgative waters.

**सौम्य रेचक**

सौम्य विरेचक, विशेषत: सौम्य विरेचक औषधी जलासाठी ही संज्ञा वापरली जाते.

**aquametry**

Determination of the water of crystallisation or moisture content in a chemical by using a titrimetric method.

**जलमिति**

अनुमापनाद्वारे एखाद्या रासायनिक पदार्थातील स्फटिकजल किंवा आर्द्रतेचे प्रमाण निश्चित करणे.

**assay**

Estimation of the potency of an active principle in a unit quantity of the material.

**१ निकषमूल्यन २ आमापन**

पदार्थाच्या एकक प्रमाणातील सत्त्वाची क्षमता ठरविणे.

**association colloid, amphiphilic colloid** — **संयोजन कलिल, उभयरागी कलिल**

Whose molecules contain two regions of opposite solvent affinities.

परस्पर विरुद्ध द्रावक आसक्ती असलेले भाग ज्यांच्या रेणूत आहेत अशी कलिले.

**ataxia** — **गतिविभ्रम**

Failure of muscular co-ordination.

स्नायुसमन्वय न साधणे.

**aversion therapy** — **विमुखता उपचार, अपवर्जन उपचार**

Method of treating addiction by producing aversion for the drug.

व्यसनकारी औषधाविषयी तिटकारा निर्माण करून व्यसनमुक्ती साधण्याची उपचार पद्धती.

## b

**bacteriological cure** — **जीवाण्वीय रोगमुक्ति**

Is a cure as shown by absence of organism in sputum, urine, etc. proved by negative cultures.

नकारात्मक संवर्धनामुळे थुंकी, लघवी, इत्यादीतील जंतुहीनता सिद्ध करून दर्शविलेली रोगमुक्ती.

**balsam** — **बालसम** (सुगंधी वृक्षनिर्यास)

These are resinous substances obtained from plants and containing benzoic or cinnamic acids or their esters.

वनस्पतींपासून मिळवलेले राळयुक्त पदार्थ. त्यामध्ये बेन्झॉइक किंवा सिनॅमिक आम्ले किंवा त्यांची एस्टरे असतात.

**bathing fluid** — **मज्जन द्रव**

Physiological solution used to provide nutrition to cells, tissues or organs.

पेशी, ऊती किंवा इंद्रिये यांच्या पोषणाकरिता वापरावयाचे द्रावण.

**binary liquid system** (*wrt* distillation) — **द्विअंगी द्रव-प्रणाली** (ऊर्ध्वपातनाच्या संदर्भात)

The mixture of only two liquids with varying boiling points composition.

भिन्न उत्कलनबिंदू असलेल्या केवळ दोन द्रवांचे मिश्रण.

**bioassay** — **जैव आमापन, जैव निकषमूल्यन**

Determination or estimation of the amount of biological activity in a unit or quantity of the material.

पदार्थाच्या एकक प्रमाणातील जैविक क्रियेचे प्रमाण निर्धारित करणे किंवा अंदाजित करणे.

**bioavailability** — **जैविक उपलब्धता**

Amount or percentage of a drug that is absorbed from a given dosage form and reaches the systemic circulation following administration.

दिलेल्या मात्रारूपातून शोषले गेलेले आणि सार्वदेहिक अभिसरणात पोचलेले औषधाचे प्रमाण किंवा टक्केवारी.

**biological half-life** — **जैव अर्धायुष्य**

The time required for one half of the substance to disappear from a biological system.

जैवसंस्थेतून पदार्थाचा अर्धांश नाहीसा होण्यास लागणारा कालावधी.

**biological lag** — **जैविक पश्चता**

Time between the administration of a drug and the development of response.

औषध देणे आणि त्याचा प्रतिसाद मिळणे यांमधील कालावधी.

**biopharmaceutics** — **जैव औषधनिर्माणविद्या**

Study of the relationship of the physio-chemical properties of a drug formulation to its pharmacokinetics.

औषधाच्या मात्रारूपाचे भौतिक-रासायनिक गुणधर्म आणि औषधाची बलगतिकी यांमधील संबंधाचा अभ्यास.

**biotransformation** — **जैव रूपांतरण**

Alternation of a drug within a living organism.

सजीवामध्ये होणारे औषधाचे रूपांतरण.

**bleeding** *Pharmaceutics* — **स्रवण**

Liberation of oil or water from ointment bases usually due to deficient gel structure.

सामान्यत: जेल संरचनेतील न्यूनतेमुळे मलमाच्या आधारद्रव्यामधून तेल किंवा पाणी वेगळे होणे.

**blender** — **अभिमिश्रणी**

A device or machine used to make uniform mixture of different powder materials.

विविध भुकटयांचे एकरूप मिश्रण करण्याचे साधन किंवा यंत्र.

**blind loop syndrome** — **बंद आंत्रवलय संलक्षण**

A surgical condition.

एक शल्यचिकित्सीय अवस्था.

**blocking agent** — **रोधी कारक**

An agent which blocks or obstructs activity, etc.

क्रिया, इ. मध्ये अडथळा आणणारा कारक.

**blood-brain barrier** — **रक्त-मस्तिष्क रोध**

Term used to describe the poor diffusion of water-soluble molecules across capillary cell membranes into the brain.

केशिकापेशीय पटलांमधून मेंदूमध्ये होणाऱ्या जलविद्राव्य रेणूंच्या मंद विसरणाचे वर्णन करताना वापरलेली संज्ञा.

**body fluid compartments** — **शरीर द्रव कक्ष, कायिक द्रव कक्ष**

It includes the plasma, interstitial fluid, transcellular fluid and cellular fluid.

यामध्ये रक्तद्रव, अंतरालीय द्रव, पारपेशिक द्रव आणि पेशी द्रव यांचा समावेश होतो.

**booster dose** — **अनुवर्धक मात्रा**

A dose smaller than the original dose, given to maintain the effect.

औषधाचा परिणाम टिकवून ठेवण्यासाठी दिलेली, मूळ मात्रेपेक्षा लहान मात्रा.

**bougie** — **शलाका, बूजी**

1 A form of medication for insertion into the urethra or other body cavity.

१ मूत्रमार्ग किंवा शरीराच्या इतर गुहिकेमध्ये निवेशनासाठी औषधोपचाराचा एक प्रकार.

2 Instrument for exploring and dilating canal especially the male urethra.

२ नलिकेच्या विशेषत: पुरुष मूत्रोत्सर्गीकेच्या समन्वेषणासाठी व विस्फारणासाठी साधन.

**breaking of emulsion** — **पायस फुटणे**

Complete irreversible separation of both phases of emulsion.

पायसाच्या दोन्ही प्रावस्थांचे कधीही पूर्ववत न होणारे विलगन.

**Brownian movement = Brownian motion** — **ब्राउनी हालचाल, ब्राउनी गति**

Random movement of particles 5 micron or less (in size) due to bombardment of the molecules of dispersion medium.

अपस्करण माध्यमाच्या रेणूंच्या माऱ्यामुळे ५ मायक्रॉन किंवा त्यापेक्षा कमी आकाराच्या कणांची यादृच्छिक हालचाल.

**buffer capacity = buffer efficiency** — **उभयरोधी क्षमता, बफर क्षमता**

Amount of strong acid or strong alkali required to change the $p^H$ of solution by a unit.

द्रावणाचे $p^H$ मूल्य एका एककाने, बदलण्यासाठी आवश्यक असणारे प्रबल आम्ल किंवा प्रभावी अल्कलीचे प्रमाण.

bulk volume — पुंज आयतन, पुंज आकारमान, राशि आकारमान

Volume occupied by bulk of material including intra-particular spaces and inter-particular spaces.

आंतरकणीय पैस व कणांतर्गत पैस धरून एखाद्या पदार्थाच्या पुंजाने व्यापलेले आयतन.

# C

cachet — काशे

These are small edible containers used for the internal administration of powdered drug. They vary in size from 3/4 to 1.1/8 inch in diameter and consist of two concave pieces of wafers made from flour and water.

औषधाचे चूर्ण पोटात घेण्यासाठी वापरली जाणारी लहान खाद्य धारके. ही पिठाच्या दोन अंतर्वक्र चकत्यांची बनवलेली असतात.

caking (of suspension) — पिंडीभवन

Formation of compact non-redispersible sediment at the bottom of the container.

पात्राच्या तळाशी पुन्हा अपस्कृत न होणारा घट्ट अवसाद तयार होणे.

calandria — नलिका-संकुल

A system of tubes used for increasing the heating surface and forming a part of vacuum evaporator.

तपन पृष्ठभाग वाढविण्यासाठी वापरलेली आणि निर्वात बाष्पकाचा भाग असणारी नलिकांची रचना.

capping (of tablets) — छत्रक विलगन

Removal or ejection of the top surface of tablet, partial or complete separation of the top or bottom crowns of a tablet from the main body of tablet.

वटिकेचा पृष्ठीय स्तर निघून जाणे किंवा निष्कासित होणे. वटिकेच्या मुख्य भागापासून वटिकेचा वरचा किंवा खालचा भाग अंशतः किंवा पूर्णतः विलग होणे.

carrier state — (अरुग्ण) वाहक स्थिति

A state of harbouring the organisms without manifest symptoms.

रोगलक्षणे स्पष्टपणे दिसत नसताना शरीरात रोगाणू वागविण्याची स्थिती.

| | |
|---|---|
| **carrier transport** | **वाहक परिवहन** |
| Active transport where a carrier molecule combines with a drug at one membrane surface and dissociates from it at another surface. | सक्रिय परिवहनात वाहक रेणूचा एका पटल पृष्ठावर औषधाशी संयोग होणे आणि दुसऱ्या पृष्ठावर त्याच्यापासून तो विलग होणे. |
| **cascading amplifier system** | **प्रपातवत् प्रवर्धी संस्था** |
| Sequential activation of biological processes. e.g. in enzyme system. | जैव प्रक्रियांचे क्रमिकप्रवर्धी सक्रियण. उदा. विकरसंस्था. |
| **cataplasm (poultice)** | **पोटीस** |
| It is a soft semisolid external application supplying medicating substance in the presence of heat and moisture. (e.g. kaolin and glycerin). | गरम व ओला असताना बाहेरून लावावयाचा मऊ व अर्धघन औषधयुक्त पदार्थ. (उदा. केओलिन व ग्लिसरिन). |
| **cathartic** | **विरेचक** |
| An agent causing bowel evacuation. | कोठा रिक्त करणारा कारक. |
| **causal prophylactic** | **कारणलक्षी प्रतिबंधक** |
| A drug that removes the cause of the disease. | रोगाचे कारण नष्ट करणारे औषध. |
| **caustic** | **दाहक** |
| Burning or corrosive, destructive to living tissue. | जाळणारा किंवा क्षरणकारी, जिवंत ऊतींचा नाश करणारा. |
| **ceiling dose** | **कमाल मात्रा** |
| The dose of a drug with which the ceiling effect is obtained. | कमाल परिणाम साधणारी औषधाची मात्रा. |
| **chelation** | **ग्राभन** |
| Combination with a metal to form a complex substance. | धातूशी संयोग होऊन संकुल तयार होणे. |

**chemical assay** — १ रसायनी आमापन २ रसायनी निकषमूल्यन

Estimation of the concentration of the active principle by means of a chemical method.

सत्त्वाच्या संहतनाचे रासायनिक पद्धतीने आमापन.

**chemotherapeutic index** — रसायनी चिकित्सा निर्देशांक

Ratio of maximum tolerated dose to the minimum therapeutic dose. (Ehrlich)

सहन केली जाणारी कमाल मात्रा व उपचारासाठी किमान आवश्यक असलेली मात्रा यांचे गुणोत्तर.

**chemotherapy** — रसायनी चिकित्सा

Treatment of infection by chemical agents.

रासायनिक कारकांद्वारे संक्रामिक रोगावर उपचार करणे.

**chromatography** — वर्णलेखन

It is a process of separating the components of a mixture by producing different rates of movements of each component in a counter-current system.

प्रतिवाह पद्धतीने प्रत्येक घटकाच्या हालचालीची भिन्न गती निर्माण करून मिश्रणातील घटकांचे विलगन करणे.

**chronic obstructive pulmonary disease** — दीर्घकालिक अवरोधी फुप्फुसरोग

Chronic bronchitis and emphysema present together with chronic airways obstruction.

श्वसनमार्गाचा अवरोध असलेला दीर्घकालीन फुप्फुसरोग.

**clarification** — स्वच्छन

The term applied in filtration when the solids do not exceed 1·0 percent and filtrate is the primary product.

घन पदार्थाचे प्रमाण १ टक्क्या पेक्षा कमी असेल अशा वेळी प्रामुख्याने द्रव पदार्थ मिळवण्याच्या उद्देशाने केलेले गाळण.

**clearance value** — निपटारा मूल्य

A mathematical expression describing the rate of removal of a metabolite from the plasma (usually ml. per minute).

रक्तद्रव्यातून चयापचयजन्य पदार्थ काढून टाकण्याचे प्रमाण सांगणारा एक गणिती वाक्प्रयोग. (हे सर्वसाधारणत: मिलि/मिनिट असे दर्शविण्यात येते.)

**closures** — संवृती, झाकणे, निमीलने

These are usually the parts of containers which are directly in contact with the contents (i.e. wads, plugs, inner caps).

औषधिद्रव्याच्या प्रत्यक्ष संपर्कात येणारे धारकपात्राचे भाग, उदा. झाकणे, आतील झाकणे, कापसाचा बोळा, इ.

**cloud point** — **अभ्रण बिंदु**

The temperature above which certain surfactant solutions show turbidity.

ज्या तपमानानंतर काही पृष्ठक्रिया-कारकाच्या द्रावणात गढूळता दिसून येते असे तपमान.

**coacervation** — **१ सपटलशुष्कन**

The transfer of macro-molecules with film properties from a solvated state, via intermediate phase, to a dry state.

पटलावगुंठित बृहत्‌रेणूंचे विद्रावित अवस्थेतून अंतरिम अवस्थेद्वारे शुष्कावस्थेत रूपांतरण.

**२ राशीभवन**

A collection or loss of fully hydrated particles of a colloid system with less solvent bound to them than they had before.

कलिल प्रणालीमधील पूर्णतः सजल कणांचे पूर्वीपेक्षा कमी द्रावकाशी बद्ध अशा स्थितीत समूहन होणे किंवा नाश पावणे.

**coarse dispersion** — **बृहत् अपस्करण**

Dispersion in which the particle size is 0·5 microns or more. e.g. suspensions and emulsions.

०.५ मायक्रॉन्स किंवा त्याहून अधिक मोठ्या आकाराचे कण ज्यामध्ये असतात असे अपस्करण. उदा. निलंबने आणि पायसे.

**coefficient of viscosity** — **विष्यंदिता गुणांक**

Ratio of shearing stress to shear rate.

कर्तन प्रतिबल व कर्तन वेग यांचे गुणोत्तर.

**cold cream** — **शीत उपलेप**

Semi-solid emulsions of water in oil types for application to the skin for emollient, protective or other surface effect.

मृदूकारी, संरक्षी किंवा इतर पृष्ठीय परिणाम साधण्यासाठी तैलांतर्गत जल पद्धतीची अर्ध-घन पायसे.

**competitive antagonism** — **स्पर्धात्मक विरोधिता**

Here the agonist and the antagonist compete for the same receptors and the extent to which the antagonism opposes the pharmacological action of the agonist will be decided by the relative numbers of receptors occupied by the two compounds.

येथे प्रचालक व विरोधक एकाच ग्राहींसाठी स्पर्धा करतात आणि प्रचालकांच्या औषधी अभिक्रियेला विरोधिता कोणत्या मर्यादिपर्यंत विरोध करते ते दोन संयुगांनी व्यापलेल्या ग्राहींच्या सापेक्ष संख्येद्वारे ठरविले जाते.

**compliance** — **अनुपालन**

Patient's adherence to instructions given about the medication.

औषधयोजनेविषयी दिलेल्या सूचनांचे रुग्णाकडून पालन.

**compulsive use** — **अनिवार्य वापर**

Use of a drug by an individual against the subject's wishes, and if denied, causing uneasiness.

एखाद्या व्यक्तीने आपल्या इच्छेविरुद्ध औषध घेणे आणि न घेतल्यास अस्वस्थता वाटणे.

**congealing spray** — **संघनक फवारा**

A spray used to congeal some fluid such as blood or biological product.

रक्त किंवा जैव उत्पादने, इ. संघनित करण्यासाठी वापरावयाचा फवारा.

**contact angle** — **संपर्क कोन**

*wrt* interfacial phenomenon and wetting.

आंतरपृष्ठीय घटना आणि आर्द्रण या संदर्भात.

**container** — **पात्र, धारकपात्र, भांडे**

Packing which contains the medicaments or formulations and is in immediate contact with the drugs. e.g. glass containers, plastic containers, metallic containers.

मात्रारूप औषधिद्रव्ये ज्यात प्रत्यक्षात साठवली जातात अशी आवेष्टने. उदा. काचेची, प्लास्टिकची व धातूची पात्रे.

**copolymerisation** — **सहबहुवारिकन**

Incorporation of two or more types of monomers in a polymer.

अनेक प्रकारच्या एकवारिकांचे बहुवारिकांमध्ये समावेशन.

**corrosive** — **क्षरणकारी**

Destructive to the texture or substance of tissue or material.

पोताला किंवा घटकाला हानीकारक.

**cosolvency** — **सहविद्राव्यता**

Increasing solubility using combination of two or more solvents.

दोन किंवा अधिक द्रावके वापरून वाढवलेली विद्राव्यता.

**counter-current mechanism** — **प्रतिवाह यंत्रणा**

1 A system of liquid-liquid extractions using multiple tubes for serial extraction from immiscible solvents.

2 A system of exchange of solvents depending on the flow of inputs and outputs in a parallel fashion for some distance. e.g. in the kidney.

१ अमिश्रणीय द्रावकांतून श्रेणीय निष्कर्षण करण्यासाठी अनेक नलिका वापरून द्रव-द्रव निष्कर्षणाची पद्धती.

२ काही अंतरापर्यंत (उदा. मूत्रपिंडातली) निविष्टी आणि उद्दिष्टी यांच्या समांतर प्रवाहावर अवलंबून असलेली द्रावकांच्या विनिमयाची पद्धती.

**counterirritant** — **प्रतिक्षोभक, प्रतिदाहक**

Irritant agent applied locally to the skin to relieve deep seated pain.

खोलवर होत असलेल्या वेदना नष्ट करण्यासाठी त्वचेला त्या भागापुरता लावावयाचा दाहक.

**creaming of emulsion** — **पायस स्नेहस्तरण, पायसावर मलई धरणे**

Separation of a part of dispersed phase from the emulsion it can be either in upward or downward direction depending upon the type of emulsions.

पायसामधून अपस्कृत प्रावस्थेच्या एका भागाचे विलगन होणे. पायसाच्या प्रकारानुसार वरच्या किंवा खालच्या दिशेने हे विलगन होते.

**critical micelle concentration** — **क्रांतिक मायसेल संहृति**

Minimum concentration of solute at which micelle formation takes place.

मायसेल तयार होण्यासाठी पृष्ठक्रियाकारकाची लागणारी लघुतम संहृती.

**cross resistance** — **अन्योन्य प्रतिरोध**

Resistance to one chemotherapeutic agent leading to that against other.

एका रसायनी चिकित्सा अभिकारकाला होणाऱ्या प्रतिरोधाच्या परिणामी दुसऱ्या अभिकारकाला होणारा प्रतिरोध.

**cross tolerance** — **अन्योन्य सह्यता**

If an individual develops tolerance to drugs belonging to a particular group, he also shows tolerance to other drugs.

एखाद्या व्यक्तीमध्ये एका विशिष्ट गटातील औषधाला सह्यता निर्माण झाल्यास त्या व्यक्तीमध्ये त्याच गटाच्या इतर औषधांनाही सह्यता दिसून येते.

**cumulation** — **संचयन**

If a drug is excreted slowly, its continuous administration may build up a sufficiently high concentration in the body to produce toxicity. This is termed as cumulation.

औषधाचे उत्सर्जन संथपणे होत असल्यास ते सतत दिले गेले तर शरीरात विषाक्तता निर्माण होण्याइतके तीव्र संहतन होते. यालाच संचयन म्हणतात.

**cumulative curve** — **संचयी वक्र**

Cumulative curve for a given dose of a drug, would give the percent of animals responding to that dose and to all lower doses.

औषधाच्या ठराविक मात्रेच्या संचयी वक्राद्वारे त्या मात्रेला आणि त्याहून कमी प्रमाणातील मात्रांना प्रतिसाद देणाऱ्या प्राण्यांची टक्केवारी दिली जाते.

## डी

**decoction** — **काढा**

Extract of a crude drug obtained by boiling it with distilled water.

असंस्कारित औषध ऊर्ध्वपातित पाण्या-बरोबर उकळवून मिळालेला अर्क.

**decongestant** — **अपसंकुलक**

A drug which reduces congestion or hyperaemia.

अतिरक्तसंचय कमी करणारे औषध.

**defervescence** — **ज्वर-ह्रास-अवधि**

The period during which the raised temperature is declining to the normal.

शरीरातील ताप कमी होऊन सामान्य पातळीवर येतो तो कालावधी.

**delirium tremens** — **सकंप प्रलाप**

An acute mental disturbance marked by delirium with trembling and great excitement attended by anxiety, mental distress, sweating, gastrointestinal symptoms and precordial pain, usually associated with chronic alcoholism.

कंप सुटून अत्यंत प्रक्षोभक अवस्था निर्माण होणे व त्याचवेळी चिंता, मानसिक दुःख, घाम फुटणे, जठरांत्र संस्थेतील बिघाडाची लक्षणे आणि हृत्पूर्व वेदना दिसून येणारा तीव्र मानसिक बिघाड – बहुधा दीर्घकालीन मद्यपानामुळे.

**delusion** — **व्यामोह**

A false personal belief based on incorrect inference about external reality and firmly maintained inspite of incontrovertible and obvious proof or evidence to the contrary.

बाह्य वस्तुस्थितीबाबतच्या चुकीच्या अनुमानावर आधारित चुकीची व्यक्तिगत समजूत आणि बिनतोड व त्याविरुद्ध उघड पुरावा किंवा दाखला मिळूनही ती समजूत तशीच कायम ठेवणे.

**demulcent** — **श्लेष्मी शामक**

The substance that will smoothen the part or soften the skin to which applied.

त्वचा किंवा अन्य भाग मृदु किंवा मुलायम करणारा पदार्थ.

**dentifrice**

It is a substance used for cleansing the surfaces of teeth.

**दंतमंजन**

दात स्वच्छ करण्यासाठी वापरावयाची पेस्ट किंवा पावडर.

**depot injection**

Injection intended to produce depot in the body from which the medicament will be leached at steady rate.

**आगार अंतःक्षेपण**

शरीरात औषधिद्रव्याचे आगार निर्माण करण्याच्या हेतूने दिलेले अंतःक्षेपण. या आगारातून ठराविक गतीने त्याचे निक्षालन होते.

**desensitisation**

To decrease the hypersensitivity by giving series of graded doses of the antigen.

**निःसंवेदन**

प्रतिजनाच्या चढत्या क्रमाने मात्रा देऊन अतिसंवेदिता कमी करणे.

**dessertspoon**

Quantity approximately equivalent to 8 milliliters.

**मध्यम चमचा**

अंदाजे ८ मि.लि. इतके परिमाण.

**diatomaceous earth**

Purified siliceous earth, e.g. purified kieselguhr.

**डायाटमी मृदा**

शुद्ध केलेली सिलिकामय मृदा. उदा. शुद्ध केलेले कीजेलघूर.

**diffuse double layer repulsion**

Repulsion between like charges present in Helmholtz double layer formed around fine particles in suspension or globule in an emulsion.

**विसरित द्विस्तरी प्रतिकर्षण**

निलंबनामधील किंवा पायसामधील सूक्ष्म कण किंवा गोलिका याभोवतालच्या हेल्म-होल्ट्झ द्विस्तरातील सजातीय भारांमधील प्रतिकर्षण.

**dilatancy**

(*wrt* Rheology) Increase in viscosity of a colloidal system with increase in shear. This is opposite of pseudoplasticity.

**विस्फारितता**

कर्तरणातील वाढीमुळे कलिली पद्धतीच्या विष्यंदितेमधील वाढ. हा गुणधर्म आभासी आकार्यतेच्या विरुद्ध आहे.

**disinfect**

To free from pathogenic organisms or render them inert.

**जंतुहीन करणे**

विकृतीजनक जीवांपासून मुक्त करणे किंवा त्या जीवांना निष्क्रिय करणे.

**disinfectant** | **जंतुनाशक**

An agent that disinfects, particularly one used on inanimate objects.

जंतूंचा नाश करणारा, विशेषत: निर्जीव पदार्थांवर वापरला जाणारा कारक.

**disintegration** | **विघटन**

Break-up of the tablet or capsule into drug granules or particles.

गोळी किंवा संपुट यांचे औषधी कणांमध्ये किंवा कणिकांमध्ये विभाजन होणे.

**dispensing** | **१ औषध तयार करून देणे २ औषधवितरण**

Giving out medicine and other necessities to the sick; filling a medical prescription.

रुग्णाला औषध व इतर आवश्यक गोष्टी पुरविणे; निर्देशपत्रानुसार औषध देणे.

**dispersed system** | **अपस्कृत रचना**

A system in which two substances are mixed in such a way that one is distributed atmost uniformly throughout the second.

दोन पदार्थ एकमेकांत एकसारखे मिसळलेले असतील अशी रचना.

**dispositional tolerance = pharmacokinetic tolerance** | **बलगतिकी सह्यता**

This is a phenomena of tolerance due to changes in drug absorption, distribution, excretion and metabolism leading to decreased intensity and duration of contact between a given drug and the target tissue.

औषधाचे शोषण, वितरण, उत्सर्जन आणि चयापचय यांत परिवर्तन झाल्यामुळे एखादे औषध आणि त्याच्या लक्ष्य ऊती यांमधील संपर्काचा अवधी व तीव्रता कमी होऊन निर्माण झालेल्या सह्यतेला बलगतिकी सह्यता म्हणतात.

**diuretic** | **मूत्रल**

An agent that promotes urine secretion.

मूत्रस्राव वाढवणारा कारक.

**diurnal rhythm** | **दैनिक आवर्तन**

Rhythmic change in a biological system over a period of twenty four hours.

जैव संस्थेत चोवीस तासांच्या कालावधीत होणारा लयबद्ध बदल.

**dosage form** | **मात्रा रूप**

The physical form in which the drug is administered.

ज्या भौतिक रूपात औषध दिले जाते ते रूप. उदा. गोळी.

**dose** | **डोस, मात्रा**

The quantity to be administered at one time.

एकावेळी द्यावयाचे प्रमाण.

**douche** — **धावन, डूश**

An aqueous solution which is forced against a part or into a cavity of the body for cleansing and antiseptic activity (e.g. eye, nasal, vaginal douche).

देहगुहिकेच्या स्वच्छतेसाठी आणि जंतुरोधी म्हणून वापरावयाचे जलीय द्रावण. हे द्रावण वेगाने प्रवाहित केले जाते.

**drug abuse** — **औषधाचा गैरवापर**

Use of illegal drugs or misuse of prescribed drugs.

कायद्याने बंदी घातलेल्या औषधांचा वापर किंवा विहित औषधांचा चुकीचा वापर.

**drug intolerance** — **औषध असह्यता**

Inability of the individual to tolerate a drug.

औषध सहन करण्याची एखाद्या व्यक्तीची अक्षमता.

**drug regimen** — **औषध विधान**

The systematic form of treatment with drug for curing diseases.

रोगमुक्तीसाठी औषधोपचाराचे पद्धतशीर नियमन.

**drug resistance** — **औषध प्रतिरोध**

The ability of a micro-organism to withstand the effects of a drug that are lethal to most members of its species.

सूक्ष्मजीवाच्या एखाद्या विशिष्ट जातीच्या बऱ्याचशा घटकांना घातक असलेल्या औषधाला तोंड देण्याची सूक्ष्मजीवाची क्षमता.

**drycota process** — **ड्राय कोटा प्रक्रिया, शुष्क अवगुंठन प्रक्रिया**

It is a process of tableting in which coating is also applied by compression.

ज्या वटिकाकरणाच्या प्रक्रियेत दाबा-बरोबरच अवगुंठन करण्यात येते अशी प्रक्रिया.

**dry gum method** — **शुष्क डिंक पद्धति**

The method of emulsion preparation using the gum in dry state.

पायस तयार करण्याची शुष्क डिंक पद्धती.

**dusting powder** — **शिंपडण्याची पूड, शिंपडण्याची भुकटी**

Any fine medicated powder for dusting on skin.

बाहेरून वापरण्यासाठी तयार केलेली बस्वगाळ औषधी पावडर.

# e

**efferyescent salts** — **प्रबुद्बुदी क्षार**

Are powders or granules composed of medicinal agents like citric acid or tartaric acid or acid sodium phosphate and sodium bicarbonate. In presence of water the ingredients react, produce effervescence forming a carbonated saline drink.

सायट्रिक आम्ल किंवा टार्टारिक आम्ल किंवा सोडियम फॉस्फेट आम्ल आणि सोडियम बायकार्बोनेट यांसारख्या औषधी कारकांची भुकटी. त्यात पाणी मिसळताच घटक पदार्थांची अभिक्रिया घडून बुडबुडे येतात आणि कार्बोनेटयुक्त क्षार पेय तयार होते.

**efficacy** (intrinsic activity) — **गुणकारिता**

The ability of the drug to elicit a pharmacological response after its interaction with the receptor.

ग्राहीबरोबरच्या अन्योन्यक्रियेनंतर औषध-शास्त्रीय प्रतिसाद निर्माण करण्याची औषधाची क्षमता.

**electrokinetic potential = zeta potential** — **विद्युतगतिज विभव, झीटा विभव**

Difference in the potential between the shear plane and the electroneutral region of the solution.

द्रावणाचे कर्तन तल आणि विद्युत उदासीन क्षेत्र यांमधील विभवातील भेद.

**electro-osmosis** — **विद्युतपरासरण**

Movement of dispersion medium with respect to a stationary dispersed phase under the influence of an electric field or migration of liquid molecules on application of an e.m.f. through a porous bed.

विद्युत क्षेत्राच्या प्रभावाखाली स्थिर अपस्कृत प्रावस्थेशी सापेक्ष अपस्करण माध्यमाची होणारी हालचाल किंवा विद्युतगामी बलामुळे कणांच्या सच्छिद्र थरामधून होणारे द्रव रेणूंचे स्थलांतर.

**electrothermodynamic potential = Nernst potential** — **विद्युतऊष्मागतिक विभव**

Difference in the potential between actual surface of a particle and the electroneutral region of the solution.

कणाचा पृष्ठभाग आणि द्रावणाचे विद्युत उदासीन क्षेत्र यांमधील विभवातील फरक.

**elixir** — **इलिक्झिर**

A sweetened, aromatic hydro-alcoholic liquid used in the compounding of medicines.

औषधांच्या संमिश्रणामध्ये वापरलेला मधुरित, सुगंधी जल–अल्कोहोली द्रवपदार्थ.

**emulsion** — **पायस**

A mixture of two immiscible liquids not mutually soluble.

परस्पर विद्राव्य नसणाऱ्या दोन द्रव पदार्थांचे मिश्रण. या मिश्रणामध्ये पायस कारकाच्या साह्याने एक प्रावस्था दुसऱ्या. प्रावस्थेत अपस्कृत केलेली असते.

**enema** — **एनिमा**

Administration of a liquid medicament into the rectum.

मलाशयात द्रवरूप औषध घालणे.

**enteric coating** — **आंत्रविद्रावी अवगुंठन, आंत्रविद्रावी विलेपन**

A formulation coated to make it gastric acid resistant and to permit release of the drug in intestine.

जठराम्लाला प्रतिरोध करणारे परंतु आंत्रामध्ये विमोचित करणारे विलेपित मात्रारूप.

**enuresis** — **असंयतमूत्रता**

Incontinence, involuntary discharge of urine.

ताबा नसलेले अनैच्छिक मूत्रोत्सर्जन.

**enzyme induction** — **विकर प्रेरण**

Increase in the activity of microsomal and other enzymes by certain chemicals.

विशिष्ट रासायनिक पदार्थांमुळे सूक्ष्म–कणिकांमध्ये आणि अन्य विकरांच्या कार्यामध्ये वृद्धी होणे.

**escharotic** — **प्रक्षारक**

Agent used to destroy tissue and to causes loughing which produces what is known as an eschar.

ऊती नष्ट करण्यासाठी आणि क्षतमांस गळण्यास मदत करणारा कारक.

**euphoria** — **सुखभ्रम**

A false sense of well being; mild elation.

सुस्थितीच्या भावनेचा आभास.

**eutectic mixture** — **सुद्रवी मिश्रण**

Melting point of two substances are lowered by mixing them together in fixed proportion. Minimum melting point obtained is eutectic point and a mixture is eutectic mixture.

दोन पदार्थांचे नियत प्रमाणात मिश्रण करून त्यांचा वितळण बिंदु खाली आणला जातो. या किमान वितळण बिंदूला सुद्रवण बिंदु व मिश्रणाला सुद्रवी मिश्रण असे म्हणतात.

**expiry date** — **मुदतसमाप्ति-दिनांक**

It is the date which generally indicates the time beyond which the article may not have the required potency, provided the prescribed storage conditions have been maintained.

साठवणविषयक विहित अटी पूर्ण केल्या असता एखाद्या पदार्थाची आवश्यक क्षमता सर्वसाधारणत: ज्या कालावधीनंतर टिकू शकणार नाही असा अवधी दर्शविणारा दिनांक.

*ex vivo* — **देहबाह्य, शरीरबाह्य, कायाबाह्य**

Outside the living body.

सजीव शरीराबाहेर.



**false neurotransmitter** — **मिथ्या चेतापारेषक**

A substance which resembles the physiological occurring transmitter in all respects except the potency.

क्षमता सोडून इतर सर्व गुणधर्मांच्या बाबतीत नैसर्गिक चेतापारेषकाशी साम्य असणारा पदार्थ.

**feed-back system** — **पश्चप्रदाय संस्था**

A process whereby a part of the output is returned to the input of the system. It may be positive or negative depending on whether the phase of the feedback signal is in phase or out of phase with the input signal.

उद्दिष्टीचा काही भाग पद्धतीच्या निविष्टीकडे परत ज्यामुळे जातो अशी प्रक्रिया. पश्चप्रदाय संकेताची प्रावस्था निविष्टि-संकेताच्या प्रावस्थेशी जुळणारी आहे की जुळणारी नाही त्यानुसार तो धन किंवा ऋण असू शकते.

**fetal alcohol syndrome** — **गर्भ अल्कोहोल संलक्षण**

Damaging effect on the foetus due to alcohol consumption during pregnancy.

गरोदरपणात मद्यपान केल्यामुळे नवजात अर्भकात दिसून येणारे दुष्परिणाम.

**filler** — **भरणद्रव्य**

Inert diluent.

निष्क्रिय विरलकारी.

**flocculated suspension** — **ऊर्णित निलंबन**

A suspension in which particles are loosely bounded which give porous sediment that can easily be dispersed.

ज्या निलंबनामध्ये शिथिलबद्ध कण असून त्यापासून सच्छिद्र अवसाद मिळतो व तो सहजगत्या अपस्कृत होऊ शकतो, असे निलंबन.

**flocculation** — **ऊर्णन**

Aggregation of colloidal particles into loosely bound, visible, rapidly sedimenting masses.

कलिल कणांचे शिथिलबद्ध, दृश्य, शीघ्र अवसादी पुंजीभवन.

**formulary** — **सूत्रसंचय, योगसंहिता**

A book containing composition, methods of preparation, uses, etc. of important formulation in current use.

सूत्रांचे पुस्तक, सूत्रपुस्तक; महत्त्वाच्या प्रचलित मात्रारूपांचे घटक तयार करण्याची पद्धती, उपयोग, इ. माहिती असलेला ग्रंथ.

**functional tolerance** — **कार्यात्मक सह्यता**

Pharmacodynamic tolerance is a phenomenon of tolerance which occurs probably due to changes in the properties and functions of the tissue, that makes them less sensitive to a given drug concentration.

ऊतींच्या गुणधर्मांतील आणि कार्यांतील बदलांमुळे निर्माण झालेली सह्यता, यालाच कार्यात्मक सह्यता किंवा औषधगतिकी सह्यता म्हणतात.



**galenicals** — **गॅलनिके**

These are pharmaceutical preparations obtained by macerating or percolating crude drugs with appropriate strength of alcohol or other suitable solvent.

पुरेशा तीव्रतेचा मद्यार्क किंवा इतर योग्य द्रावकामध्ये असंस्कारित औषधिद्रव्ये मृदूलन किंवा झरण करून बनवलेले सिद्ध पदार्थ.

**gargle** — **गुळणी**

These are fluid (liquid) preparations for use as mouth washes.

मुख व कंठ धावनासाठी वापरण्यात येणारे द्रव औषधि-पदार्थ.

**gauze** — **गॉझ**

It is loosely woven cloth conforming to the official standards.

अधिकृत दर्जाचे जाळीदार कापड.

**gegenions / counterions**

Ions present on the diffused layer surrounding a particle, possessing a charge opposite to that on the particle surface.

**गेगेनायने**

कणाच्या पृष्ठभागावर असलेल्या प्रभाराच्या विरुद्ध प्रभार असलेले आयन. हे कणाभोवतीच्या विसरित स्तरामध्ये असतात.

**gel**

A colloid dispersion which sets to a semisolid or solid mass under appropriate conditions of concentration and temperature.

**जेल**

संहति व तापमान यांच्या सुयोग्य स्थिती-मध्ये अर्धघन किंवा घनरूप धारण करणारे कलिली अपस्करण.

**gelfoam**

Sterile, pliable, non-antigenic surgical sponge, prepared from gelatin.

**जेलफोम**

शल्यक्रियेमध्ये वापरला जाणारा जिलेटिन-पासून बनवलेला अप्रतिजनी, निर्जंतुक व प्रत्यास्थ स्पंज.

**generic drugs**

Generic names (of drugs) are derived from chemical structure of parent compounds.

**प्रजातीय औषधे**

मूळ संयुगाच्या रासायनिक संरचनेवर आधारित औषधांची नावे.

**gold number**

Weight in mg. of dry protective colloid which must be added to 10 ml. of red gold sol to prevent precipitation by addition of 1 ml. 10% NaCl solution.

**सुवर्णांक**

१० मिलिलिटर लाल सुवर्ण सोलमध्ये, १ मिलि १० टक्के सोडियम क्लोराइड घातल्यानंतर होणाऱ्या अवक्षेपणाला प्रति-बंध करण्यासाठी आवश्यक असलेल्या शुष्क संरक्षक कलिलाचे मि. ग्रॅ. मध्ये वजन.

**granules**

Aggregation of fine particles bound together by the use of additional tablet adjuvants.

**कणिका**

वटिका साह्यकारी पदार्थाचा वापर करून केलेले सूक्ष्म कणांचे समुच्चयन.

**granule volume**

Volume occupied by a material including intra-particular spaces but excluding inter-particular voids.

**कणिका आकारमान**

आंतरकणीय पैस वगळता एखाद्या पदार्थाने व्यापलेले आयतन/आकारमान.



**habituation** — **सवय लागणे**

Being accustomed to anything from frequent use.

कोणत्याही वस्तूच्या वारंवार वापरामुळे तिची सवय लागणे.

**half-life** — **अर्धायुष्य**

The period of time required for the amount or concentration of a drug to decrease by one half.

औषधाचे संहतन किंवा प्रमाण निम्म्याने कमी होण्यासाठी लागणारा कालावधी.

**hallucination** — **निराधारभ्रम**

False perception having no relation to reality and not accounted for by any external stimuli.

वास्तवाशी काहीही संबंध नसणे आणि कोणत्याही बाह्य उद्दीपनाशिवाय मिथ्याबोध निर्मिती.

**hang-over** — **पश्चात् जाड्य**

Unpleasant after-effects of excessive alcoholic consumption.

अतिमद्यपानाचे अप्रिय पश्चात्परिणाम.

**haptophore** — **आधारकारक**

The chemical group in a drug that helps it to get attached to a receptor.

ग्राहीशी संलग्न होण्यास ज्याची मदत होते असा औषधातील रासायनिक गट.

**hard soap** — **कठीण साबण**

Sodium soap prepared by saponification of any vegetable oil.

कोणत्याही वनस्पति-तेलाचे साबणीकरण करून तयार केलेला सोडिअम ओलीएट-युक्त साबण.

**healthy carrier** — **अरुग्ण वाहक**

A carrier who never had the disease.

जो विशिष्ट रोग ज्यास कधीही झाला नाही असा वाहक.

**hemodialysis** — **रक्त अपोहन**

The process of separating the crystalloids of the blood from the colloids by means of an external device.

रक्तातील स्फटिकाभ, बाह्य साधनाने वेगळे करण्याची प्रक्रिया.

**HLB** (hydrophilic lipophilic balance)

Scale to measure the relative hydrophilicity and lipophilicity within a surfactant molecule.

**एचएलबी**

पृष्ठक्रियाकारकाच्या रेणूतील सापेक्ष जलरागितेची आणि वसारागितेची मापनश्रेणी.

**humoural**

Humour is a chemical that exists independent of an intact cell, in a body fluid.

**रस–, द्रव–, द्रवीय, द्रवी**

शरीर द्रवामध्ये पूर्ण पेशीवर अवलंबून नसलेले रसायन.

**hypodermoclysis**

Injection of fluids into the subcutaneous tissues to supply the body with liquids.

**अधस्त्वचा द्रवाधान**

शरीराला द्रव पदार्थांचा पुरवठा करण्यासाठी अधस्तरीय ऊतींमध्ये द्रायु पदार्थांचे अंतःक्षेपण.

**hypothermia**

Decreased body temperature below normal.

**अवतप्तता, अधस्तप्तता**

शरीराचे तापमान प्रसामान्य तापमानापेक्षा कमी होणे.

## i

**iatrogenic disease**

Diseases produced as a result of therapeutic measures.

**भिषग्जन्य रोग**

उपचारामुळे निर्माण झालेले रोग.

**idiosyncrasy** (pharmacogenetic differences)

Special characteristics by which persons differ from each others or which makes one react differently from others.

**विलक्षणता, प्रत्यात्मता**

व्यक्तींची परस्पर भिन्नता आणि प्रतिक्रिया दर्शविणारी जीनी लक्षणे.

**illusion**

Inaccurate perception; misinterpretation of sensory impression.

**संवेदनाभ्रम**

चुकीचा समज; ज्ञानेंद्रियांमुळे निर्माण झालेल्या संवेदनांचा चुकीचा अर्थ लावणे.

**imbibition**

Absorption of liquid by a gel or solid body.

**१ विचोषण २ अंतःशोषण**

जेल किंवा घन पदार्थामध्ये द्रवाचे शोषण.

**immunomodulator**

Agent modifying immunological responses in the body.

**प्रतिक्षमता आपरिवर्तक**

प्रतिक्षमता प्रतिसादामध्ये बदल घडवून आणणारे कारक.

**incompatibility**

It refers to any combination of ingredients which possess undesirable mostly antagonistic qualities of either therapeutic, chemical or physical nature.

**असंयोज्यता**

उपचारी, रासायनिक किंवा भौतिक स्वरूपाचे अनिष्ट गुणधर्म, बहुधा विरोधी गुणधर्म असलेल्या घटकांचा कोणताही संयोग.

**infection**

Invasion and multiplication of microorganisms in body tissues.

**संक्रमण**

शरीराच्या ऊतींमधील सूक्ष्मजीवांचे आक्रमण आणि त्यांचे बहुगुणन.

**infestation**

Parasitic attack or subsistence on the skin and intestine.

**बाधा, पर्याक्रमण**

त्वचेवरील किंवा तिच्या उपांगावरील किंवा आतड्यामधील परजीवी आक्रमण किंवा पोषण.

**infusion**

A dilute extract of vegetable drug obtained by macerating it with water (usually boiling) and straining the liquid without pressing the residue.

**फाण्ट**

बहुधा उकळत्या पाण्याबरोबर मृदुल केल्यावर अवशिष्ट पदार्थांवर दाब न देता गाळून मिळालेला औषधी वनस्पतींचा विरल अर्क.

**inhaler**

Special type of container to inhale volatile medicaments for local or systemic effect.

**श्वसित्र**

स्थानिक किंवा सार्वदेहिक परिणाम साधण्यासाठी बाष्पनशील औषधे श्वसनाद्वारे आत घेण्यासाठी विशिष्ट पद्धतीचा धारक.

**inoculation**

Intentional introduction of a microorganism into the body as a preventive against the acquisition of certain disease.

**लसटोचणी**

विशिष्ट रोगाच्या प्रादुर्भावास प्रतिबंधक म्हणून शरीरात हेतुपुरस्सर सूक्ष्मजंतूचा शिरकाव करविणे.

**insufflation**

A snuff or a fine powder intended for insufflation.

**प्रधमन भुकटी**

तपकीर किंवा प्रधमनासाठी वापरलेली अत्यंत बारीक पावडर.

**intrinsic**

Located entirely within or pertaining exclusively to a part.

**अंगभूत, अंतःस्थ, आंतरिक**

संपूर्णपणे एका भागांतर्गत किंवा पूर्णपणे एका भागाशी संबंधित असलेले.

**inunction**

Act of anointing or applying an ointment or liniment by friction.

**चोळून लावणे, मर्दन**

मर्दनद्रव किंवा मलम चोळून लावण्याची क्रिया.

*in vitro*

(In loboratory)

**अंतःपात्र**

(जसे प्रयोगनलिकेमध्ये)

*in vivo*

In the living body.

**अंतर्जीव**

सजीव शरीरात.

**ionophoresis (*also* iontophoresis)**

Introduction of ions of soluble salts into body by means of electric current.

**आयन संचलन**

विद्युत प्रवाहाद्वारे विद्राव्य क्षारांचे आयन शरीरात घालणे.

**irritation**

1 Reaction to that which is irritating. 2 Extreme reactions to pain or pathological conditions.

**क्षोभ, विक्षोभ, संदाह**

१ पदार्थांमुळे होणारी क्षोभक प्रतिक्रिया. २ वेदना किंवा विकृतिजन्य स्थितीमुळे होणारी आत्यंतिक प्रतिक्रिया.

**isoelectric point**

The $p^H$ point at which the dispersed protein has no surface charge and hence can be easily precipitated.

**समविद्युत बिंदु**

ज्या $p^H$ बिंदूवर अपस्कृत प्रोटीनमध्ये पृष्ठ प्रभार नसल्याने त्याचे सहज अवक्षेपण करता येते असा बिंदु.

**isosteres**

Isosteres are compounds having identical physio-chemical properties.

**समविन्यासी**

समविन्यासी संयुगे आकार, परिमाण आणि रेणूभार यांबाबतील एकरूप असतात.

**isotonicity**

State of having and maintaining normal and uniform resistance or tension: having equal osmotic pressure on either side of semipermeable membrane.

**१ समताणता २ समपरासरणता**

प्रसामान्य व एकरूप प्रतिरोध किंवा ताण असण्याची किंवा राखण्याची स्थिती, अर्धपार्य पटलाच्या दोन्ही बाजूस परासरण दाब समान असण्याची स्थिती.

**isotonic solution value**

Volumes of water to be added to a specified weight (0·3 or 1 gm.) of a drug to prepare an isotonic solution.

**समपरासरी द्रावण मूल्य**

(०.३ किंवा १ ग्रॅम) विशिष्ट वजनाच्या औषधाचे समताणी द्रावण बनविण्यासाठी आवश्यक पाण्याचे प्रमाण.

# j

**jelly**

A class of gels in which the structurally coherent matrix contains a high portion of liquid, usually water.

**जेली**

जेलीचा एक असा वर्ग की ज्यामध्ये संरचनात्मकदृष्ट्या संसंजी आधारकात द्रवाचे (साधारणपणे पाण्याचे) प्रमाण बरेच अधिक असते.

**jet injection**

Transcutaneous introduction of a drug by means of a high velocity jet projected through a microfine orifice.

**जेट इंजेक्शन, स्रोत अंतःक्षेपण**

अतिसूक्ष्म रंध्रामधून प्रक्षेपित केलेल्या वेगवान फवाऱ्याद्वारे त्वचेपार औषध पोचविणे.

---

# k

**kinematic viscosity**

The ratio of absolute viscosity to density.

**शुद्धगतिकीय विष्यंदिता**

केवल विष्यंदितेला घनतेने भागून मिळणारे गुणोत्तर.

**kraft point**

Temperature at which solubility of surfactant equals CMC. (critical micelle concentration)

**क्राफ्ट बिंदु**

ज्या तापमानाला पृष्ठक्रियाकारकाची द्रावकता क्रांतिक मायसेली संहतीच्या बरोबर असते असे तापमान.

---

# l

**lamella**

A glycerogelatin disc with or without drug for use in the eye.

**नेत्र औषधी चकती**

डोळ्यात वापरण्यासाठी औषधासह किंवा औषधाशिवाय असलेली ग्लिसेरोजिलेटिन चकती.

**lamination**

Separation or ejection of tablet into two or more layers.

**स्तरिकीभवन, स्तर विलगन**

वटिकेचे दोन किंवा दोनपेक्षा अधिक स्तरांमध्ये विलगन होणे.

**leading dose**

A large initial dose for achieving the therapeutic concentration of a drug.

**प्रारंभिक भारक मात्रा**

एखाद्या औषधाची उपचारकारी संहति साध्य करण्यासाठी दिलेली मोठी प्राथमिक मात्रा.

**levelling effect**

*wrt* ionic solutions and electrolytic equilibria.

**समतलन परिणाम**

आयनी द्रावणे व विद्युत अपघटनी समतोल यांच्या संदर्भात.

**linctus**

A sweetish viscous liquid or preparation to be sipped slowly or licked.

**लिंक्टस**

हळूहळू घोट घेण्यासाठी किंवा चाटण्यासाठी तयार केलेला गोडसर विष्यंदी द्रव.

**littermate**

One of the members of the same litter.

**सहसंतति**

एकाच वीणीतील अपत्ये.

**long acting dosage form**

These are the products intended to provide for extended action of drug from a single dose of administration.

**दीर्घ प्रभावी मात्रारूप**

औषधाची एकच मात्रा दिली असता त्यातून औषधाची दीर्घकालीन क्रिया होऊ शकेल असे मात्रारूप.

**lyophilisation**

A process of drying in which water is sublimed from the product after it is frozen.

**प्रशुष्कन**

उत्पादित वस्तू गोठवून ती संप्लवनाने शुष्क करण्याची प्रक्रिया.

# m

**maceration**

The process of keeping with occasional stirring solid ingredients in whole of the solvent till complete solubilisation of solute ingredient, pressing the mark of clarifying the combined extracts.

**मृदूलन**

द्राव्य घन पदार्थाचे द्रावणात पूर्णपणे विलयन होईपर्यंत ते द्रावकात ठेवण्याची व अधूनमधून ढवळण्याची प्रक्रिया.

**maintenance dose**

A dose given to maintain the therapeutic concentration already achieved.

**परिरक्षक मात्रा**

यापूर्वीच साध्य झालेली उपचारकारी संहति टिकवून ठेवण्यासाठी दिलेली मात्रा.

| | |
|---|---|
| ***materia medica*** | **द्रव्यनिघंटु, मटेरिया मेडिका** |
| Older term for a branch of pharmacology concerned with sources, description and preparation of drugs. | औषधांची उत्पत्ती, वर्णन व सिद्धी यांच्याशी संबंधित औषधशास्त्र शाखेची जुनी संज्ञा. |
| **membrane pump** | **पटल पंप** |
| A biochemical mechanism that maintains the ionic concentrations across a living sodium pump. | सजीव पटलाच्या दोन्ही बाजूंवरील आयनी संहती टिकवून ठेवणारी जीवरासायनिक यंत्रणा. उदा. सोडिअम पंप. |
| **menstruum** | **निष्कर्षी द्रावक** |
| Solvent used for extraction of crude drug. | मूळ स्वरूपातील औषधाच्या निष्कर्षणासाठी वापरण्यात येणारे द्रावक. |
| **metabolic pathway** | **चयापचय प्रक्रियामार्ग** |
| Different stages involved in the metabolism of a metabolite or different route encountered by a metabolite during its metabolism. | चयापचयकाच्या चयापचयामधील निरनिराळ्या रासायनिक अवस्था. |
| **micelle** | **१ मायसेल २ कलिलकण समूह** |
| 1 Micelle is a colloidal system formed by aggregate of molecules or ions of small size. These are amphiphilic and come together at high concentration or low temperature. | १ ही रेणू किंवा आयन यांच्या समुच्चयांनी बनलेली एक कलिली पद्धत आहे. हे कण उभयरागी असून उच्च संहति किंवा कमी तापमानात एकत्र असतात. |
| 2 Aggregates consisting of 50 or more monomers (molecules) of surfactant and whose size falls in the colloidal range. | २ ५० किंवा अधिक एकवारिकांचा कलिल मर्यादित मोडणारा समूह. |
| **microencapsulation** | **सूक्ष्मसंपुटन** |
| It is a process in which thin layer of coating is applied to the small particles, liquid droplets. | अतिसूक्ष्म कण व द्रवबिंदुक यावर पातळ थर देण्याची प्रक्रिया. |
| **—mimetic** | **—अनुकारी** |
| Imitative, e.g. acetylcholine mimetic. | अनुकरण करणारा, उदा. ॲसिटिलकोलीन अनुकारी. |

**minimum inhibitory concentration** — **किमान निरोधी संहति**

The minimum concentration of a drug that inhibits the growth of micro-organisms (expressed in micrograms per ml.).

सूक्ष्मजीवांची वाढ रोधणारी औषधाची किमान मात्रा. (ही मायक्रोग्रॅमस् प्रति मिलिलिटर अशी दर्शविण्यात येते.)

**molecularity** — **रेणुकता**

Order of each elementary reaction in process.

एखाद्या प्रक्रियेतील प्रत्येक प्राथमिक अभिक्रियेची कोटी.

**mutagenic effects** — **उत्परिवर्ती परिणाम**

Mutation = A sudden change of chromosomal material which alters the effect of this material on the physiology of the cell.

गुणसूत्र द्रव्यामध्ये एकाएकी घडून येणारे व त्यामुळे पेशीकार्यामध्ये बदल घडविणारे परिणाम.

---

## N

**nasal drops = nosedrops** — **नासाबिंदू**

Aqueous or oily drops containing medicament to be used in the nasal cavity.

नाकात घालावयाचे जलीय किंवा तैलयुक्त औषधी बिंदू.

**nomogram** — **सूत्र आलेख**

Representation by graphs, diagrams or charts of the relationship between numerical variations.

आलेख, आकृत्या किंवा तक्ते याद्वारे चलांमधील संख्यात्मक संबंध दर्शविणे.

**non-competitive antagonism** — **अस्पर्धात्मक विरोधिता**

Antagonist inactivates the receptor so that the effective complex with the agonist cannot be formed irrespective of the concentration of the agonist.

ग्राहीला विरोधी पदार्थ अशा रीतीने निष्क्रिय करतो की प्रचालकाचे संहतन झाले तरीही प्रचालकाबरोबर परिणाम-संकुल तयार होऊ शकणार नाही.

# O

**ointment** — **मलम**

A semi-solid dosage form to be used with rubbing.

चोळून लावण्याचे अर्धघन मात्रारूप.

**order of reaction** — **अभिक्रिया कोटि**

Sum of exponents of concentration term of the rate.

संहतिसंज्ञाच्या ज्या घातांक बेरजेवर अभिक्रिया वेग अवलंबून असतो तो अंक.

**order point system** — **मागणी बिंदु पद्धति**

एखाद्या औषधाचा वा पदार्थाचा साठा ठराविक पातळीखाली जाताच मागणी करण्याची पद्धती.

**organoleptic evaluation** — **अतींद्रिय मूल्यमापन**

The evaluation with the help of special human sense organs.

मानवी ज्ञानेंद्रियांच्या साह्याने एखाद्या पदार्थाचे मूल्यमापन.

**osmolality** — **आस्मोलता**

Expressions of osmotic pressure solution in term of number of moles of a non-ionizable substance per kg. of solvent.

१ कि. ग्रॅ. द्रावकातील न-आयनी पदार्थाच्या ग्रॅम रेणूंच्या संख्येच्या रूपात द्रावणाच्या परासरणी दाबाची अभिव्यक्ती.

**osmolarity** — **परा-ग्रॅमरेणुता**

Expression of osmotic pressure as term of number of moles of a non-ionisable substance per litre of the solution.

१ लिटर द्रावणातील न-आयनी पदार्थाच्या ग्रॅम रेणूंच्या संख्येच्या रूपात द्रावणाच्या परासरणी दाबाची अभिव्यक्ती.

**overage** — **आधिक्य**

Amount of extra active ingredient added to the formulation so that at least the amount stated on label is available at the expiry date of the product.

उत्पादनाच्या समाप्ति-दिनांकाला लेबलवर उल्लेख केलेली मात्रा उपलब्ध व्हावी यासाठी मात्रारूपात मिळवण्यात आलेले अतिरिक्त सक्रिय घटक.

# P

**packaging** — **वेष्टन**

It is a process of covering or putting the material in proper cover so as to protect it from damage and in addition to this, in some cases (as in cosmetics) to give it attractive appearance.

एखाद्या पदार्थाचे संरक्षण होण्यासाठी किंवा तो आकर्षक दिसावा यासाठी केलेले आच्छादन.

**pan coating** — **पात्रलेपन**

Coating applied on tablets, granules, etc. by putting them in rotating pan.

कणिका, वटिका, इ. फिरत्या पात्रांमध्ये ठेवून त्यांवर केलेले लेपन.

**parenteral** — **परान्त्रीय**

Said of the routes of administration other than the alimentary tract.

अन्नमार्गाव्यतिरिक्त इतर मार्गाद्वारे (विशेषत: अंत:क्षेपणाद्वारे) औषध देण्याचे मार्ग.

**parvule** — **लहान गुलिका, छोटी गुलिका**

A small sugar-coated pill.

लहानशी शर्करावगुंठित गोळी किंवा गुलिका.

**passive diffusion** — **क्रियाशून्य विसरण**

Transfer of the molecules or ions (food or drug) due to the concentration gradient.

संहति प्रवणतेमधील फरकामुळे रेणू किंवा आयन यांचे स्थानांतर होण्याची क्रिया.

**pastille** — **पेस्टाइल**

A form of lozenge, made of gelatoglycerine using mold.

साचा वापरून जिलेटोग्लिसरीनचा बनविलेला चूषिकेचा प्रकार.

**peak plasma concentration** — **सर्वोच्च जीवद्रव्य संहति**

The maximum concentration of a drug reached in the plasma before the level starts falling.

पातळी घसरू लागण्यापूर्वी जीवद्रव्यात तयार झालेली एखाद्या औषधाची कमाल संहती.

**pellet** — **गोळी, गुलिका**

Small coated granules which release the drug successively and continuously over a prolonged period.

ज्यांमधून एकामागोमाग, सातत्याने व दीर्घ कालावधीसाठी औषध विमोचित केले जाते अशा लहान अवगुंठित कणिका.

**percolation** — **झरण**

The process of extraction of soluble matter from a powdered crude drug by subjecting it to the solvent action of a gravitating liquid.

द्रावकाच्या गुरुत्वीय झिरपण्याने भुकटी केलेल्या असंस्कारित औषधिद्रव्यापासून विद्राव्य पदार्थांचे निष्कर्षण करण्याची प्रक्रिया.

**peritoneal dialysis** — **उदरच्छदी अपोहन**

Dialysis in which the peritoneum is used as the dialysing membrane.

ज्यामध्ये अपोहनकारी पटल म्हणून उदरच्छदाचा वापर केला जातो असे अपोहन.

**permissive effects** — **अनुज्ञेय परिणाम**

The 'necessary' but 'not sufficient' role of a substance in an activity.

एखाद्या क्रियेमध्ये पदार्थाची 'आवश्यक' परंतु 'अपर्याप्त' अशी भूमिका.

**permisiveness** — **अनुज्ञेयता**

The regulatory action of a hormone (e.g. corticoid) in relation to that of other hormone; "the necessary but not sufficient" role of corticosteroids in concert with other forces.

एखाद्या संप्रेरकाची (उदा. कॉर्टिकॉइडची) इतर संप्रेरकाच्या संबंधातील नियामक क्रिया; कॉर्टिकोस्टेरॉइडची इतर बलांबरोबर होणारी "आवश्यक परंतु अपुरी" भूमिका.

**pessary** — **पेसरी, सोंगटी**

A formulation which is inserted into the vagina.

योनीमध्ये ठेवावयाचे मात्रारूप.

**pharmaceutics** — **औषधनिर्माणविद्या**

Science of preparation of medicines.

औषध तयार करण्याचे शास्त्र.

**pharmacodynamics** — **औषधगतिकी**

Study of the biochemical and physiological effects of drugs and their mechanism of action.

औषधांचे जीवरासायनिक व शरीरक्रियात्मक परिणाम आणि त्यांचे कार्यतंत्र यांचा अभ्यास.

pharmacogenetics

Science concerned with the genetically mediated variations in drug responses.

औषध आनुवंशिकी

औषधाच्या प्रतिसादातील जीनी विभेदांशी संबंधित शास्त्र.

pharmacognosy

A study of cultivation, collection identification and preparation of medicinal substances from natural sources.

औषधअभिज्ञान

नैसर्गिक स्रोतापासून मिळणाऱ्या औषधी पदार्थांची लागवड, संग्रह, अभिज्ञान आणि सिद्धी, इ. विषयांचा अभ्यास.

pharmacokinetics

Study of absorption, distribution, metabolism and excretion of drugs and their relationship to pharmacologic response.

औषध बलगतिकी

औषधांचे शोषण, वितरण, चयापचय व उत्सर्जन आणि औषधशास्त्रीय प्रतिसाद यांच्या संबंधाबाबतचा अभ्यास.

pharmacopoeia

Official code containing a selected list of established drugs and medicinal preparations with description of their physical properties and tests for their identity, purity and potency, e.g. Indian pharmacopoeia.

अधिकृत औषधनिघंटु

प्रस्थापित औषधे आणि औषधीय सिद्ध पदार्थ यांची निवडक सूची तसेच त्यांचे भौतिक गुणधर्म यांचे अभिज्ञान, शुद्धता आणि समता पारखण्याच्या कसोट्यांचे विवरण, इ. असलेली अधिकृत संहिता. उदा. इंडियन फार्मॅकोपिआ.

pharmacy

Science of identification, selection, preservation, preparation, standardisation, compounding, dispensing and distribution of medicinal substances.

औषधनिर्माणशास्त्र

औषधी पदार्थांचे अभिज्ञान, निवड, जतन, सिद्धी, प्रमाणन, संमिश्रण आणि विविध प्रकारे वितरण यांबाबतचे शास्त्र.

phase inversion

Interchanging of phases in emulsion.

प्रावस्था व्यस्तन

पायसामधील प्रावस्थांची अदलाबदल होणे.

photosensitiser

A drug or chemical which makes the skin sensitive to light.

प्रकाश संवेदिताकारक

त्वचा प्रकाशसंवेदी होण्यासाठी वापरले जाणारे औषध किंवा रसायन.

physical dependence

Achievement by the body, of an adaptive state, that manifests itself by intense physical disturbance when the drug is withdrawn.

शारीरिक अवलंबिता

औषध बंद केल्यावर शारीरिक अस्वस्थता प्रकर्षाने दर्शविली जाते अशी अवस्था शरीरात निर्माण होणे.

**physical pharmacy**

The area of pharmacy that deals with the quantitative or theoretical principles of science as they applied to the practice of pharmacy.

**भौतिकी औषधनिर्माणशास्त्र**

औषधनिर्माणशास्त्राला लागू होणारी परिमाणात्मक व सैद्धांतिक शास्त्रीय तत्त्वांचा परामर्श घेणारी औषधनिर्माण-शास्त्राची शाखा.

**physiological antagonism**

A drug reverses the effects of another drug by acting on different receptors.

**कार्यात्मक विरोधिता**

निरनिराळ्या ग्राहींवर होणाऱ्या क्रियेद्वारे एक औषध दुसऱ्या औषधाच्या उलट परिणाम घडवून आणते.

**picking**

Adherence to and removal of tablet material from surface by a punch.

**दाबक आसंजन**

दाबकाच्या पृष्ठभागाला वटिकेचा काही भाग चिकटून बाहेर येणे.

**pilot plant** (scale up technique)

Smaller plant developed to achieve precise and reliable method of manufacture in order to effect an orderly transition for laboratory procedures and formulation to routine production operation.

**पथदर्शी संयंत्र**

एखाद्या औषधाचे व्यापारी उत्पादन करण्यापूर्वी त्याची उत्पादनशक्यता अजमावण्यासाठी लहान प्रमाणात परंतु सर्वंकष विचार करून पथदर्शी संयंत्र तयार करणे.

**placebo**

Inactive substance given to satisfy patient's demand for medicine.

**तोषक**

रुग्णाच्या समाधानासाठी दिलेला निष्क्रिय पदार्थ.

**placental barrier**

A functional barrier to the passage of substances between the maternal and fetal circulations.

**अपरा अवरोध**

माता व गर्भ यांच्या रक्ताभिसरणातील पदार्थांच्या परस्परपार्यतेला कार्यात्मक अडसर.

**polymorphism**

The existence of one or more crystalline and/or amorphous form of chemical substance.

**बहुरूपता**

एखाद्या रासायनिक पदार्थाचे एक किंवा अनेक स्फटिकी आणि/किंवा अस्फटिकी रूपात अस्तित्व.

**preparation** (isolated)

An organ or the tissue removed from the body for pharmacological study.

**विरचना**

औषधशास्त्रीय अभ्यासासाठी शरीरातून अलग केलेले इंद्रिय किंवा ऊती.

**prescription drug** — **निदशपत्र अनिवार्य औषध**

A drug which can be dispensed or supplied only on the prescription of a registered medical practitioner.

नोंदणीकृत वैद्यक व्यवसायीने दिलेल्या निर्देशपत्राशिवाय न मिळणारे औषध.

**protective colloid** — **संरक्षी कलिल**

Hydrophilic colloid added in large concentration to impart stability to a hydrophobic colloid.

जलविरोधी कलिलास स्थैर्य प्राप्त करून देण्यासाठी मोठ्या प्रमाणात जलरागी कलिल त्यात घालणे.

**psychological dependence** — **मानसिक अवलंबिता**

A condition in which a feeling of satisfaction and a psychological drive exists; that requires periodic or continuous administration of the drug to produce pleasure or to avoid discomfort.

ज्या अवस्थेत समाधानाची भावना आणि मानसिक तडफ निर्माण करण्यासाठी सुखाची भावना निर्माण करणारे किंवा अस्वस्थता टाळणारे औषध अधूनमधून किंवा सातत्याने घ्यावे लागते ती अवस्था.

**psychorheology** — **मनःस्रोतशास्त्र**

Study of rheology related to those factors affecting the psychologic and sensory characteristics of a buyer (such as spreadibility, feel, etc.).

ग्राहक मानसशास्त्राशी संबंधित स्रोतशास्त्राचा अभ्यास. (उदा. प्रसरणक्षमता, स्पर्श, इ.).

**purgative** — **अतिसारक**

An agent that will cause watery evacuation of the intestinal contents.

आंत्रीय मल जलरूपाने रिक्त करणारा कारक.

# q

**quantal responses** — **द्विविकल्पी प्रतिसाद**

Are 'all or none' responses.

द्विविकल्पी प्रतिसाद हे 'पूर्ण वा शून्य' प्रतिसाद असतात.

## r

**racial tolerance** — **वांशिक सह्यता**

A tolerance to a drug shown by members of a particular race.

एखाद्या विशिष्ट वंशातील लोकांची एखाद्या औषधाच्या बाबतीतील सह्यता.

**radical curatives** — **समूळ संसाधके**

Eradicating the erythrocytic as well as the exoerythrocytic phase of malaria.

हिवतापाच्या परजीवाणूंची शोणितावस्था तसेच शोणिताबाह्य अवस्था नष्ट करणारे.

**rate-determining step = key step** — **गतिनिर्णायक टप्पा**

The slowest step in a series of reactions.

प्रतिक्रियांच्या मालिकेतील मंदतम वेगाचा टप्पा.

**rate of shear = velocity gradient** — **कर्तर वेग, वेग प्रवणता**

Difference in the velocity between two planes of liquid which are divided by the distance between them.

सूक्ष्म अंतरावर असलेल्या द्रवाच्या दोन प्रतलांच्या वेगातील फरक भागिले प्रतलां-मधील अंतर.

**receptor** — **ग्राही**

Are proteins or enzymes and can be regarded as definite structural entities interacting with the active principle.

ही प्रथिने किंवा विकर असून औषधांची ज्यांच्याशी अन्योन्यक्रिया होते अशा पेशी-मधील विवक्षित संरचना.

**refractory period** — **विलंबकारी अवधि**

Period during which a tissue responds less than normal to a stimulus.

उद्दीपनाला ऊती नेहमीपेक्षा कमी प्रतिसाद देते असा कालावधी.

**relative contraindication** — **निरपवाद निषिद्धता**

A condition in which a particular drug has to be used cautiously though it is not absolutely contra-indicative.

एखादे औषध निरपवाद निषिद्ध नसले तरी ते काळजीपूर्वक वापरणे जरूर असते अशी परिस्थिती.

**repeat action** (dosage form) — **पुनरावृत्त क्रिया**

It provides for usual single dose of drug and is so constructed as to provide another single dose at some later time.

औषधाची नेहमीची एकच मात्रा दिली असता कालांतराने आणखी मात्रा पुरविली जाते.

**repository** — **निधानी**

A storage type of dosage form.

साठवण पद्धतीचे मात्रारूप.

**re-uptake** — **पुनर्ग्रहण**

(ref : neurotransmitter release) — (संदर्भ : चेतापारेषक मोचन)

**rheology** — **स्रोतशास्त्र**

The branch of physics that deals with the deformation and flow of matter.

पदार्थाचे विरूपण व प्रवाह यांच्याशी संबंधित असलेली भौतिकशास्त्राची शाखा.

**righting reflex** — **सम्यकी प्रतिक्षेप**

Any of the reflexes which enables an animal to maintain the body in a definite relationship to the head and thus maintain its body right side up.

आपले शरीर व डोके एका निश्चित पद्धतीने नैसर्गिक स्थितीत ठेवण्यास प्राण्याला मदत करणारा कोणताही एक प्रतिक्षेप.

**rotating rod = rota rod** — **घूर्णीदंड**

(Psychopharmacology) — (मनोऔषधशास्त्र)

# S

**sclerosing agent** — **दृढकारक**

An irritating substance used to obliterate varicose veins or fibrose uncomplicated piles.

अपस्फीत शिरा नाहीशा करण्यासाठी किंवा गुंतागुंत नसलेली मूळव्याध तंतुमय करण्यासाठी वापरण्यात येणारा क्षोभक पदार्थ.

**sedimentation potential** — **अवसादन विभव**

Opposite of electrophoresis; a potential generated due to the movement of dispersed phase / solid particles in respect to stationary liquid medium.

स्थिर द्रव रेणु सापेक्ष घन कणांच्या हालचालीमुळे उत्पन्न झालेले विभव.

**sensitivity** — **सूक्ष्मग्राहिता, संवेदिता**

Ability to respond to a drug.

औषधाला प्रतिसाद देण्याची क्षमता.

**serum sickness** — **रक्तलस रुग्णता**

A complex of symptoms following the injection of foreign serum.

परकीय लसीच्या अंतःक्षेपणामुळे निर्माण होणारे संलक्षण.

**shearing stress**

Deforming force per unit area.

**कर्तरण प्रतिबल**

प्रति एकक क्षेत्र विरूपण बल.

**shelf life**

A period between the date of manufacture and the date of consumption of a product.

**साठवण कालमर्यादा**

उत्पादन दिनांक आणि मुदतसमाप्ति-दिनांक यांमधील कालावधी.

**sibling**

One of two or more children of the same parents.

**सहोदर**

एकाच मातापित्याच्या दोन किंवा अधिक मुलांपैकी एक.

**side effect**

Pharmacological undesirable effects produced with therapeutic doses of the drug.

**आनुषंगिक परिणाम**

औषधाच्या उपचार - मात्रेमुळे झालेले अनिष्ट औषधशास्त्रीय परिणाम.

**simple syrup**

A near saturated solution of sucrose in purified water.

**साधा पाक, साधे सिरप**

सुक्रोजचे शुद्ध पाण्यातील जवळजवळ संपृक्त असलेले द्रावण.

**sodium chloride equivalent** (or tonicic equivalent)

Amount of sodium chloride which is equivalent to (i.e. has the same osmotic effect as) a specified weight unit of the drug.

**सोडिअम क्लोराइड सममूल्य**

विशिष्ट वजनाच्या औषधिद्रव्याइतकी समताणता असणाऱ्या सोडिअम क्लोराइडचे वजन.

**soft soap**

Potassium soap made by saponification of vegetable oils except coconut oil and palm kernel oil, without the removal of glycerin.

**मृदु साबण**

खोबरेल व पाम तेलाव्यतिरिक्त इतर कोणत्याही वनस्पति तेलापासून ग्लिसरीन वेगळे न काढता तयार केलेला पोटॅशिअम-युक्त साबण.

| | |
|---|---|
| **soil** | **सॉल** |
| A general term used for dispersions of solids in liquid, solid or gaseous media. Prefixes are used to indicate the dispersion media, e.g. hydrosol, alcosol, benzosol etc. | घन पदार्थाच्या द्रव, घन, किंवा वायुरूप माध्यमातील अपस्करणासाठी वापरली जाणारी एक सर्वसाधारण संज्ञा. अपस्करण माध्यमाचे नाव उपसर्गासारखे जोडण्यात येते. उदा. हायड्रोसॉल, अल्कोसॉल, बेन्झोसॉल, इ. |
| **solution tablet** = **solvellae** | **विद्राव्य वटिक** |
| | उपचारापूर्वी पाण्यात विरघळवून वापरण्याची वटिका. |
| **species tolerance** | **जाति सह्यता** |
| Abilities of certain animal species to tolerate certain drugs in quantities lethal to human beings. | मानवाला मारक ठरेल इतक्या प्रमाणातील काही औषधे सहन करण्याची विशिष्ट प्राणिजातींची क्षमता. |
| **specificity** (of drug action) | **विशिष्टता** (औषधी अभिक्रियेची) |
| 1 Producing a particular action. | १ विशिष्ट औषधी क्रिया घडवणे. |
| 2 Producing a particular action by a particular mechanism. | २ विशिष्ट यंत्रणेद्वारा विशिष्ट औषधी क्रिया घडवणे. |
| **standardisation** | **मानकन, प्रमाणन** |
| 1 Comparison with a standard. | १ मानकाशी तुलना. |
| 2 Adjustment of the strength to bring it to the level of standard. | २ मानकाच्या पातळीत आणण्यासाठी संहतीचे समायोजन. |
| **sticking** | **साचा आसंजन** |
| Adherence to tablet material to die-wall. | वटिकेचा भाग साच्याला चिकटून राहणे. |
| **Stokes' diameter** | **स्टोक व्यास** |
| Diameter of an equivalent sphere undergoing sedimentation at the same rate as the asymmetric particles. | असममितीय कणांच्याच वेगाने अवसादन होणाऱ्या समतुल्य गोलाचा व्यास. |

**streaming potential** — **स्रवण विभव**

Potential generated, due to movement of liquid molecules through a porous plug.

सच्छिद्र निगाद्वारे (प्लगाद्वारे) होणाऱ्या द्रव रेणूंच्या हालचालीमुळे उत्पन्न झालेले विभव.

**structure activity relatioship (SAR)** — **संरचना–क्रिया संबंध (संक्रिसं)**

The relationship between the chemical structure and the drug action.

रासायनिक संरचनेचा औषधी क्रियेशी संबंध.

**structured vehicles** — **संरचित वाही**

Aqueous solutions of polymeric materials, used as suspending agents.

निलंबन कारक म्हणून वापरली जाणारी बहुवारिकीय पदार्थांची जलीय द्रावणे.

**stupor** — **जडावस्था**

State characterised by lowering of consciousness and/or dumbness and decreased spontaneous movement.

संज्ञाक्षीणता आणि/किंवा मूकता व उत्स्फूर्त हालचालींची मंदता ही वैशिष्ट्ये असलेली स्थिती.

**sublingual tablet** — **अधोजिह्वा वटिका**

A tablet which is placed below tongue for the absorption of drug in the blood directly.

एखाद्या औषधाचे थेट रक्तामध्ये अवशोषण व्हावे म्हणून जिभेखाली ठेवावयाची वटिका.

**sunscreen** — **सौर संरक्षी, रोधक उपलेप**

Preparation for protecting the skin from sunburn reactions arising out of ultraviolet rays of the sun.

सूर्याच्या जंबुलातीत किरणांमुळे उद्भवणाऱ्या प्रतिक्रियांपासून त्वचेचे संरक्षण करणारे औषध.

**superinfection** — **अधिसंक्रमण**

Appearance of a new infection during the chemotherapy of a primary one.

मूळ संक्रमणावरील रसायनी चिकित्सा चालू असताना नवीन संक्रमण निर्माण होणे.

**supervised regimen of therapy** — **पर्यवेक्षित उपचार मालिका**

A drug given to a patient in a clinic in the supervision to ensure compliance.

निश्चित अनुपालनासाठी रुग्णाला चिकित्सालयातील देखरेखीखाली केलेली औषध योजना.

**suppository** — **वर्तिका**

A semisolid dosage form for the insertion into the rectum.

मलाशयात ठेवावयाचे-अर्धघन मात्रारूप.

**surfactant = surface-active agent** — **पृष्ठक्रियाकारक, पृष्ठसक्रियक**

Chemical compounds which lower the surface tension of liquids.

द्रवांचा पृष्ठताण कमी करणारी रासायनिक संयुगे.

Molecules or ions adsorbed at interfaces with a resultant reaction in interfacial tension.

आंतरपृष्ठावर अधिशोषण होऊन तेथील ताण कमी करणारे रेणू.

**swelling of a gel** — **जेल शोफ, जेल फुगवटा**

Absorption of a liquid by a gel resulting in increase in its volume.

जेलद्वारे द्रवाचे शोषण झाल्यामुळे त्याच्या आकारमानात होणारी वाढ.

**syneresis** — **सोत्सर्ग आकुंचन**

Shrinking of a gel structure on standing. This is due to continuous coarsening of structure, resulting in squeezing out of liquid.

स्थिरावल्यावर जेल संरचनेचे होणारे आकुंचन. सतत भरडीकरण होऊन द्रवोत्सर्ग झाल्याने हा बदल घडून येतो.

**synergism** — **सहयोगिता**

Facilitation of a pharmacological response by the concomitant use of two or more drugs.

अनेक औषधांच्या एकाचवेळी केलेल्या वापरामुळे औषधशास्त्रीय प्रतिसाद सुकर होणे.

---

## t

---

**tablespoon** — **मोठा चमचा**

Quantity approximately equivalent to 15 mililiters.

अंदाजे १५ मिलिलिटर इतके परिमाण.

**tablet** (dosage form) — **वटिका**

Tablet may be defined as solid pharmaceutical dosage form prepared by compressing or molding powder or granules.

संपीडन किंवा साचा पद्धतीने कणिका किंवा पावडरपासून तयार केलेले औषधीय घन मात्रारूप.

**tachyphylaxis** — **क्षिप्रप्रतिरक्षा**

Acute tolerance.

अल्पकाळात विकसित होणारी सह्यता.

**teaspoon** — **लहान चमचा**

Quantity approximately equivalent to 5 mililiters.

अंदाजे ५ मिलिलिटर इतके परिमाण.

**teratogenicity** — **अपरूपजनकता**

1 Characteristic ability to produce monsters.

2 Birth defects produced by the drugs.

१ विरूप प्राणिनिर्मितीची लक्षणीय क्षमता.

२ औषधांमुळे गर्भात निर्माण झालेले जन्मपूर्व दोष.

**therapeutic index** — **उपचार निर्देशांक**

Ratio of the median lethal dose to the median effective dose.

मध्यक प्राणहारक मात्रेचे मध्यक परिणाम मात्रेशी गुणोत्तर.

**thixotropic coefficient** — **क्षोभप्रवाहिता गुणांक**

Loss in shearing stress per unit due to increase in shear rate, or rate of breakdown of shearing stress with time at constant shear rate.

कर्तर वेगाच्या वाढीमुळे प्रति एकक कर्तर प्रतिबल कमी होणे किंवा स्थिर कर्तर वेगाच्या कालावधीबरोबर कर्तर प्रतिबलाचा विभंजन वेग.

**thixotropy** — **क्षोभप्रवाहिता**

1 The isothermal reversible sol-gel transformation produced by rest/shear.

2 Isothermal and comparatively slow recovery on standing of material, of consistency lost shearing.

१ विराम किंवा कर्तन यामुळे घडून येणारे सोल-जेलमधील प्रतिक्रमी समतापी बदल.

२ कर्तनामुळे गेलेली सांद्रता पदार्थ स्थिरावल्यावर समतापी व तुलनात्मकदृष्ट्या हळूहळू पूर्ववत होण्याची क्रिया.

**threshold dose** — **प्रभावसीमा मात्रा, प्रभावदर्शी किमान मात्रा**

Minimum dose required to produce a measurable response.

मोजता येण्याजोगा प्रतिसाद निर्माण करणारी किमान मात्रा.

**threshold potential** — **प्रभावदर्शी विभव**

The magnitude of cell membrane potential at which an action potential is initiated.

पटल विभवाच्या ज्या महत्तेला कार्यकारी विभव सुरू होतो ती पातळी.

**throat paint** — **थ्रोट पेंट, घसा लेप**

Liquid preparation for application to the mucous membrane.

घशाच्या श्लेष्म पटलाला लावावयाचे पातळ औषध.

**tie line** — **बंधनरेषा, टाय लाईन**

( solubility temperature diagram ) The line drawn across the region containing two phases in a solubility temperature curve.

द्राव्यता तपमानातील दोन प्रावस्था दर्शवणाऱ्या क्षेत्रामधून काढलेली रेषा.

**tight closed = securely closed** — **घट्ट बंद** (केलेला)

It refers to containers which protect from contamination with extraneous solids, liquids or vapours and prevent changes, due to efflorescence, deliquescence or by evaporation.

बाहेरील घन पदार्थ, द्रव पदार्थ किंवा बाष्प यांच्या संदूषणापासून संरक्षण करणाऱ्या धारकपात्रांचे हे वैशिष्टय असून त्यामुळे फुलारणे, आर्द्रविद्राव्यता किंवा बाष्पन यांमुळे होणाऱ्या बदलास प्रतिबंध होतो.

**time released capsule** — **नियत मोचनी संपुटिका, नियत मोचनी कॅप्सुल**

Capsule for oral use, which releases the active drug, over a definite period of time.

तोंडाने घ्यावयाची संपुटिका, तिच्यातून क्रियाशील औषध नियत कालावधीत विमोचित केले जाते.

**tissue affinity** — **ऊति आसक्ति**

Ability of a drug to combine with particular tissues.

विशिष्ट ऊतींशी संलग्न होण्याची औषधाची क्षमता.

**toxophore** — **क्रियाकारक**

The chemical group in a drug which enables it to produce its pharmacological action.

एखाद्या औषधास त्याची औषधशास्त्रीय क्रिया घडवून आणण्यास मदत करणारा औषधातील रासायनिक गट.

**tranquiliser** — **मनःशामक**

A drug which calms, soothes, quiets or pacifies the patient.

रुग्णाला शांत करणारे, त्याचे दुःखशमन करणारे, त्याला निवांत स्थितीत ठेवणारे किंवा प्रशमन करणारे औषध.

**transmitter** (substance) — **पारेषक**

A change in physiological activity from one place to another.

शरीरक्रियेतील बदल एका ठिकाणाहून दुसरीकडे पारेषित करणारा पदार्थ.

**troche = lozenge** — **चूषिका**

Medicated disc or other preparation to be sucked in mouth for local action on the throat.

घशावरील स्थानीय क्रियेसाठी तोंडात ठेवून चघळावयाची औषधयुक्त चकती किंवा गोळी.

**true tolerance** — **वास्तव सह्यता**

Receptor mediated tolerance, sometimes referred to as functional tolerance.

ग्राहीमधील बदलामुळे निर्माण झालेली क्षमता. कधीकधी यालाच कार्यात्मक सह्यता म्हणतात.

**true volume** — **वास्तव आकारमान**

Actual volume occupied by a substance excluding both intraparticular and interparticular voids.

आंतरकणीय व कणांतर्गत दोन्ही पैस वगळता एखाद्या पदार्थाने व्यापलेले प्रत्यक्ष आयतन/आकारमान.

## V

**vagolytic** — **भ्रमणचेतालयी**

Reducing the physiological control exerted by the vagus nerve.

भ्रमणचेतेचे शरीरक्रियात्मक नियंत्रण कमी करणारे.

**vial** — **छोटी बाटली**

It is a glass bottle with lid or cover and it is used for single or multiple dose of drug.

झाकण किंवा आच्छादन असलेली ही काचेची बाटली असून अंतःक्षेपणाची एक मात्रा किंवा अनेक मात्रा साठवण्यासाठी ती वापरली जाते.

**viscosity** — **१ सांद्रता २ विष्यंदिता**

Resistance of a fluid to flow.

प्रवाहास प्रतिरोध असणाऱ्या द्रवाचा गुणधर्म.

# W

**weight and size**

Sedimentation method of particle size estimation.

**आकारमान आणि वजन**

कण आकारमान निर्धारित करण्याची अवसादन पद्धती.

**well-closed**

It refers to containers which protect from contamination with extraneous solids and under normal condition of handling, storage and transportation, prevent unintentional release of contents.

**व्यवस्थित बंद (केलेला)**

बाह्य घन पदार्थांच्या संदूषणापासून संरक्षण करणाऱ्या धारकपात्राचे हे वैशिष्टच असून त्यामुळे सामान्य परिस्थितीत हाताळणी, साठवण व परिवहन केल्यास आतील पदार्थ बाहेर येत नाही.

**wet gum method**

The method of emulsion preparation using the gum in the form of mucilage.

**आर्द्र डिंक पद्धति**

(पायस तयार करण्याची)

**wet seal** (cachets and capsules)

The two halves of the capsule, one is filled with the powder and the other is moistened with water and placed over the filled half and flanges pressed together is known as wet seal or aqueous seal.

**आर्द्रसील, जलसील**

संपुटिकेच्या दोन अर्धांपैकी एकात भुकटी भरून दुसरा पाण्याने ओलसर करून तो भुकटी भरलेल्या अर्धावर बसवणे व दाब देणे. या प्रक्रियेस आर्द्रसील किंवा जलसील म्हणतात.

**witness tube**

It is sealed glass capsule or tube containing a substance which melts at a temperature of autoclaving and is used for testing sterilisation.

**निर्जंतूकरणदर्शक नलिका**

ही ऑटोक्लेवनाच्या तपमानावर वितळणारा पदार्थ भरलेली सीलबंद काचेची संपुटिका किंवा नलिका असून ती निर्जंतूकरण चाचणीसाठी वापरली जाते.

**writhing**

It is defined as a stretch torsion to one side drawing up of a hind leg, retraction of the abdomen and opisthotonus so that the belly of the mouse touches the floor. (neuropharmacology)

**तगमग**

विशिष्ट अंगस्थिती.
(चेता औषधशास्त्र)

## X

**xerogel** — **शुष्क जेल**

Without any liquid.

कोणत्याही द्रव्याव्यतिरिक्त.

## y

**yield value** — **प्राप्ति मूल्य**

The minimum amount of shearing force which must be applied to plastic body to begin its flow.

आकार्य पदार्थाला प्रवाही करण्यासाठी लागणारे किमान कर्तन बल.

## Z

**zwitterionic colloid=ampholytic colloid** — **त्स्विटरआयनी कलिल, उभयलयरागी कलिल**

Association colloids with both positively and negatively charged motives in their molecules.

ज्यांच्या रेणूमध्ये घन आणि ऋण अशा दोन्ही प्रकारचा प्रभार आहे असे संयोजन कलिल.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई

## प्रकाशने मिळण्याची ठिकाणे :

१. **संचालक**
मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय
महाराष्ट्र राज्य
नेताजी सुभाष मार्ग, मुंबई ४०० ००४.
दूरध्वनी : ३६३ २६ ९३, ३६३ ०६ ९५
३६३ ११ ४८, ३६३ ४० ४९

२. **व्यवस्थापक**
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार
फोटोझिंको मुद्रणालय आवार, जी.पी.ओ. नजिक
पुणे ४११ ००१.
दूरध्वनी : ६२ ४१ ५९.

३. **व्यवस्थापक**
शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार
सिव्हिल लाईन्स,
नागपूर ४४० ००१.
दूरध्वनी : ५२ २६ १५.

४. **सहा. संचालक**
शासकीय लेखनसामग्री भांडार व
ग्रंथागार, शहागंज, गांधी चौकाजवळ,
औरंगाबाद ४३१ ००१.
दूरध्वनी : ३३१५२५.

५. **व्यवस्थापक**
शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार
ताराबाई पार्क,
कोल्हापूर ४१६ ००३.
दूरध्वनी : ६५ ०३ ९५ व ६५ ०४ ०२

---

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई